







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# दीपावली

वर्षारंभ अंक

वर्ष १८ वें: मार्च ६२

मूल्य १ रुपया

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका








वर्षारंभ अंक

★ ★ ★ ★ ★ ★ ★ ★ ★ ★ ★ ★ ★ ★ ★ ★ ★

वर्ष १८ वें ★ मार्च १९६२

# दीपावली

★ साहित्य ★ कला ★ संस्कृति

## श्रेयनामावलि—

● रामराव नीळकंठ ओक—मला आवडलेलीं कांहीं पुस्तकें—वुडहौस ● पद्माकर गोवईकर—लाडक्या परीट ● डॉ. श्री. शां. आजगांवकर—इन्क्विझीशन ● जुन्यांतलें सोनें—इन्साफ ● आनंद साधले—कविता कामिनीचा मुग्ध हास ● आत्माराम नीळकंठ—सौतीचा गोंधळ ● नलिनी सुखठणकर—पेटते पहाड ● ज्योत्स्ना देवधर—असा आहे यांचा स्वभाव ● गोपालकृष्ण भोबे—प्रवास माझ्या गोमंतकाचा ● स्फूर्तिचीं फुलें—अनिकेत ● दीपमाला—सारस्वत, माधव सातवळेकर, बाळ ज. पंडित. ● मं. भा. नाडकर्णी—हुतात्मा कंदर्प ● रसिक मनोहर—नाटक झाले स्पर्धेचें हें ● भय्यासाहेब ओंकार—अश्रूंतून जन्मलेली कलाकृति ● प्रश्न पंचाईत. इ. इ.

संपादक-मुद्रक-प्रकाशक श्री. दीनानाथ दलाल. दलाल आर्ट स्टुडिओ ४०–४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोष्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. या अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन.

दलाल आर्ट स्टुडिओ ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोन ७०७६५



अनुक्रमणिका



'भास'

# कविता कामिनींचा मुग्ध हास

गुणानाम् वा विशालानां सत्काराणांच नित्यशः
कर्तारः सुलभा लोके विज्ञातारस्तु दुर्लभः ॥–॥

जातीच्या सुंदरांना कांहींहि शोभतें हें कालिदासाचें विख्यात वचन 'सर्व शोभनीयं सुरूपं' या भासाच्या उक्तीवरून त्याला स्फुरलें. कालिदासानेंहि ज्याच्या कल्पना आदरानें स्वीकारल्या असा हा भास संस्कृतचा सर्वांत ज्येष्ठ नाटककार होय. हा जवळ जवळ महाभारतकार सौतीचा समकालीन असून इसवी सनापूर्वी व कालिदासापूर्वी सुमारें चारशें वर्षें हा त्याचा काल मानला जातो. संस्कृत कविता-कामिनी कालिदासाच्या कालीं रम्य विलासिनी बनली, आणि मादक शृंगारानें ओथंबलेल्या कलापूर्ण आलापानीं तिनें रसिकतेस जादूनें गुंगवून टाकलें. या विलासिनी रमणीची निरागस मुग्धता आणि रुचिर बाल्य भासाच्या कवितेंत दिसून येतें.

भास हा नाटककार मोठा दुर्दैवी होय. जीवनधारा ओतून त्यानें निर्मिलेली कविता परीक्षणासाठीं अग्निकुंडांत टाकण्यांत आली. कवीच्या निरागस कलेची परीक्षा तिला जाळून घ्यावी असें ज्यांना स्फुरलें ते परिक्षक धन्य होत. बिचारा कवी भल्या पहाटे थंडींत उठून जलाशयावर गेला असेल; हळूहळू ढगांवर रंगांचें वैभव उधळीत अरुणोदय झाला असेल; सूर्याच्या कोवळ्या किरणशलाका अवखळपणें धावत तेथें आल्या असतील; त्या या अनोळखी कवीला बघून लाजल्या असतील; त्यांना लाजून गोंधळलेलें बघून कमलिनी झपकन् उमलली असेल, आणि तिनें त्या शलाकांस आपल्या परागांत लपवून ठेवलें







अनुक्रमणिका

असेल, हें बघून कवीची समाधी लागली असेल, आणि त्याच्या हृदयाची कळी उमलून प्रतिभेचा सुगंध तरल काव्यरचनेच्या रूपानें बाहेर उधळला असेल........

—आणि या कोमल प्रक्रीयेची यत्किंचितहि जाणीव नसणाऱ्या कुणी पाषाणानें या काव्यरचनेचें मोल पहाण्यासाठीं तिला अग्नींत टाकून दिलं. कामिनीचें मोल मापण्यासाठी तिला चाबकानें फोडून काढावें, कुसुमाचा गंध जाणण्यासाठीं त्याला हत्तीच्या पायातळीं टाकावें, तसाच हा प्रकार. पण या विश्वामधें असेहि पाषाण असतात. अशा पाषाणामुळेंच गुणाढ्याला आपल्या विश्वमोहिनी बृहत्कथेचे सहा लक्ष श्लोक जाळावे लागले. अशाच्यामुळेंच वृंदावनात घुमणाऱ्या मुरलीच्या माधुरीशींच जिची तुलना ती आपली गाथा तुकयाला इंद्रायणींत सोडावी लागली. बिचारा कवि अशा प्रसंगी काय करणार ? हृदय पिळवटून त्याच्या नेत्रातून अश्रूंची संततधार वाहिली म्हणून तिनें अग्नि थोडाच विझणार ?

भासाची ही दुर्दैवी कविता शेकडों वर्षें लुप्त झाली होती. भास नुसता नामशेष होता. अशा वेळीं चमत्कार झाला. नववें आश्चर्य घडलें. विठ्ठल कृपेनें गाथा तरंगावी, जगन्नाथाच्या कृपेनें पद्मावतीची नेत्रकमलें पुन्हा उघडावीं, तशीं भासाचीं तेरा नाटकें गणपति नावाच्या दाक्षिणात्य महापंडिताला १९५ सालीं उपलब्ध झालीं. आणि सारें साहित्यिक विश्व स्तिमित होऊन गेलें. हीं सारीं नाटकें पूर्णावस्थेंत नसलीं तरी भासाचें उत्कृष्ट नाटक स्वप्नवासवदत्त हें पूर्ण नाटकांतील एक आहे. सागरानें गिळंकृत केलेल्या धनभांडारातील थोडासा अंशहि लाटेनें बाहेर आल्यावर कृपणास आनंदाचें भरतें यावें तसें या साहित्यलाभानें रसिक लोक परमानंदात तल्लीन होऊन गेले. हीं नाटकें अशीं सापडण्याचा चमत्कार घडला हें दुर्दैवी भासाचें आणि आपलेंहि त्यांतल्यात्यात सुदैव.

कालिदास, शूद्रक, भवभूति असे पुढचे मोठमोठे कवि भासाचा आदर्श आणि कल्पना समोर ठेवताना दिसतात. कवितेच्या ऐन उमेदींत तिचे जे गुण पुढें प्रकर्षाला पावले आणि ज्याच्या मोहिनीनें जगातील रसिक वेडावले त्या साऱ्या गुणाचें बाल्यातील मुग्ध स्वरूप भासामधें दिसतें. पुढच्या कवींचे पृथक गुण भासामधें एकत्र दिसतात एवढेंच नव्हे तर त्याच्या बाहेरचे गुणहि दिसतात. व्यासाच्या महाभारतावर पुढील कवींच्या पिढ्यान्‌पिढ्या पोसाव्या तसें भासाच्या नाट्यगुणाचें झालें आहे. त्याच्या नाटकांतील माधुरी इतर कवींनी लुटली तरी त्यांना पुरी पडली आहे.

मोजक्याच शब्दांमधें कोमल भावनांचें विश्व फुलविण्याची भासाची किमया अगाध आहे. "अरे ! हा शीलातल सुखोष्ण आहे. माझी प्रिया नुकतीच याच्यावरून उठून गेली असावी," उत्तान अशा शृंगारिक आसक्तीचें हें किती थोडक्यात आणि सोज्ज्वल वर्णन !

पुढें पुढें कवितेचा शृंगार रम्यतर बनत असतांच निर्गलहि बनत गेला. त्याच्याशीं तुलना करतां भासाचा शृंगार अधिक सुसंस्कृत आणि घरंदाज वाटतो. "पद्मावती जरी आपल्या रूपानें आणि गुणानें माझें मनास भुरळ घालीत असली तरी वासवदत्तेशीं ( मृत वाटणाऱ्या बायकोचें नांव ) भावनिबद्ध झालेलें माझें मन ती हरवून घेऊं शकत नाहीं." असें भासाचा उदयन म्हणतो. आणि हें ऐकून ऐकणारी पद्मावती मत्सरानें जळण्याऐवजीं अशी आकांक्षा धरते कीं हें उदात्त हृदय मीहि असेंच भावनिबद्ध करुन घेईन. हा प्रसंग कालिदासाच्या शृंगारा एवढा मादक नसेल पण तो कामधेनूच्या धारोष्ण दुधासारखा निर्मळ आहे. "गोष्टी बोलता बोलता रात्रच संपली" या भवभूतीच्या पुढच्या उद्गारांत जी दाम्पत्य जीवनाच्या आदर्शाची परमावधि झालेली दिसते तिचीच छटा "गीत वाद्यांनी मला रिझवीत असता ती मधेंच थांबून सुहास्य वदनानें माझ्याशीं गुजगोष्टी करीत असे." या भासाच्या उद्गारात दिसते. एवढेंच नव्हे एकाच कथानकावर असलेले भासाचे "प्रतिमा" आणि भवभूतीचे "महावीरचरित" हीं नाटकें पाहिलीं कीं काव्यांत भासापुढें गेलेला भवभूति नाट्यात भासाच्या मागें असल्याची जाणीव होते. पुढील छोटा संवाद पहा.

सीताः– अवदातिके हें काय ग तुझ्या हातात ?

अवः– महाराज्ञी, याला वल्कल म्हणतात.

सीताः– मग तूं इकडे कशासाठीं आणलेंस ?

अवः– नेपथ्यपालिकेची जरा गंमत करण्यासाठीं. आता हे तिला दिसलें नाहीं कीं तिची मोठी धादल उडेल.

सीताः– इकडे आण जरा गडे. मला नेसून कसें दिसतें तें पहातें.

अवः– महाराणी, सौंदर्याला सारें शोभूनच दिसतें.

आणि सीता वल्कल नेसते. याच वेळीं तिला वल्कल नेसवून वनांत धाडणारा प्रसंग इतरत्र घडत असतो. हें नाट्य अत्यंत करुणरम्य आहे.

याच प्रतिमा नाटकामधें राम वनांत गेल्यावर सुमंताच्या सुखांत बोलतां बोलतां "राम लक्ष्मण सीता" असे शब्द येतात. तेव्हा दशरथ त्याला दटावतो. वनातच नव्हे तर शब्दात सुद्धा "राम सीता लक्ष्मण" असें हवें. सीता, शब्दात सुद्धा, त्या दोघांच्या मागें पडली तर त्या सुकुमार अबलेचें रक्षण कोण करील ? एखादा कठोर शब्द लगेच मागोमाग आला तर ? ती सुरक्षित आणि मधेंच हवी. दशरथाची सीतेवरील मातृसदृश माया सबंध वाल्मीकीरामायणात जेवढी दिसत नाहीं तेवढी इथें दिसते.

ही भासाची कला. पुढें प्रकट झालेल्या सर्व उत्तमोत्तम गुणांनी नटलेली भासाची ही कन्या. मुग्धा कविता कामिनी.

—आणि हिचें मोल ठरविण्यासाठीं हिला जाळण्यात आलें. उगाच नाहीं भास म्हणतो, "नित्यशः जागोजाग विशाल गुणाचें प्रदर्शन होत असते. तें जाणण्याची पात्रता असणारेच दुर्मीळ असतात."

—आनंद साधले

• • •




*दीपावलीची ही नवी उद्बोधक लेखमाला.*

*महाराष्ट्राचे लाडके विडंबनकार*

श्री. शामराव नीळकंठ ओक

*यांनी नारळ फोडून 'सूतोऽवाच' म्हटलेलें आहे.*

# 'कामांत असलेला' पी. जी. वुडहौस

आपल्याला एखादें करमणुकीचें नंदनवन सांपडलें असावें, त्याचा आनद इतरांनाही लुटायला मिळावा म्हणून त्याबद्दल कांहीं माहिती लिहिण्याचें मनात आणावें, आणि अचानक आपल्या कल्पनेपेक्षां कितीतरी परिपूर्ण व मनोवेधक असें त्या नंदनवनाचे वर्णन आयतें हातात पडावें, हा अनुभव नुकतेंच प्रसिद्ध झालेलें 'पी. जी. वुड हौस ॲट वर्क' हें पुस्तक पाहून आला. रिचर्ड अस्बॉर्न यासमीक्षकानें पाच वर्षें पी. जी. वुड हौसचें संपूर्ण लिखाण अभ्यासून दहा प्रकरणात त्याचें मूल्यमापन व रसग्रहण केलें आहे. सर्वस्वी मनोरंजक साहित्याचा आढावा हांसत खेळत घेण्याचा हा उपक्रम यशस्वी ठरला आहे.

वुडहौस हा आज जगांतील सर्वश्रेष्ठ विनोदी लेखक आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. नुकतेंच त्यानें ऐशींव्या वर्षांत पदार्पण केलें आणि त्याची ताजी विनोदी कादंबरीहि, 'आइस इन द बेडरूम' 'शय्यागारांतलें जवाहिर' परवाच प्रसिद्ध झाली. विनोद सृष्टीचा हा विश्वामित्र आजतागायत साठ वर्षें नियमानें लिहीत आहे. अजूनही तो रोज सहा तास टंकयंत्रापुढें बसून काम करतो, १९०३ पासून आतापर्यंत गोष्टींचे संग्रह व कादंबऱ्या मिळून त्याचीं सुमारें ऐंशी पुस्तकें प्रसिद्ध झालीं, व त्याच्या कितीतरी आवृत्त्या निघाल्या. कादंबऱ्याचीं नाटकें, अनुवादित व सहलिखित नाटकें, पद दिलेलीं नाटकें; वगैरे मिळून त्याचीं पस्तीस एक नाटकें रंगभूमीवर आलीं व त्याच्या कथानकांवर पंचवास चित्रपटही निघाले. चटकदारपणा पाहिला तर त्याची पन्नास वर्षांपूर्वीची कादंबरीहि त्याच्या आजच्या कादंबरी इतकीच वाचकाला खुलवते.

सुरुवातीला वुडहौसनें 'टिटबिट्स,' 'ॲन्सर्स' सारख्या करमणुकी साप्ताहिकांतून स्फुट लिखाण केलें, नंतर 'कॅप्टन' या मुलांसाठींच्या मासिकात त्याच्या शालेय वातावरणातील कादंबऱ्या क्रमशः छापून आल्या. प्रौढांसाठीं त्याची पहिली कादंबरी 'लव्ह अमंग द चिकन्स' (कोंबड्या पाळतांना प्रेम) तेरा सालीं प्रसिद्ध झाली. त्यानंतरही त्याने 'माइक' ही शालेय जीवनावर एक कादंबरी मुलासाठीं लिहिली व अजूनहि मुलांसाठीं लिहिलेल्या कादंबऱ्यांत तिला अग्रस्थान आहे, पंधरा सालीं 'समथिंग फ्रेश' (कांहींतरी नवीन) ही त्याची कादंबरी 'सॅटर्डे ईव्हिनिंग पोस्ट' या अमेरिकन साप्ताहिकानें क्रमशः प्रसिद्ध करण्यासाठीं पस्तीसशें डॉलर्सना घेतली व तेव्हांपासून त्याचें यशस्वी लेखन अव्याहत चालू राहिलें आहे हंसविणाऱ्या गोष्टी किंवा कादंबऱ्या हें आपलें क्षेत्र त्यानें निश्चित केलें व त्या क्षेत्रात अविरत झटत राहून त्यानें एकाहून एक सवाई अशीं रंजक पुस्तकें लिहून कीर्ति व संपत्ति मिळविली. झालें हें काम पुष्कळ झालें असें मानून तो कधीं स्वस्थ बसला नाहीं. अजूनही 'पंच' या ब्रिटिश विनोदी साप्ताहिकांत पंच त्याचे लेख मधून मधून येत असतात.

दोन महायुद्धां दरम्यानच्या काळांत पंधरा वर्षें वुडहौसचें सरासरी वार्षिक उत्पन्न एक लाख पौण्ड होतें. पुस्तकांच्या 'रॉयल्टीज' खेरीज संगीत नाटकांच्या मिळणाऱ्या रॉयल्टीजनीहि त्याला भरपूर पैसा मिळवून दिला. त्यांच्या पुस्तकांची भाषांतरें कित्येक अन्य भाषांतून झालीं पण इंग्रजी भाषेचे वाक्प्रचार, इंग्रजी जीवनांतले संदर्भ आणि इंग्रजी

मनाच्या प्रतिक्रिया कुठल्याहि भाषांतरांत तंतोतंत व्यक्त होत नसल्यानें वुडहौसचा रसास्वाद केवळ इंग्रजींतूनच घेतां येतो. विनोदी लेखक म्हणून वुडहौसला पैसा व लोकप्रियता लाभली असली तरी तो खरी मान्यता पावला इंग्रजी भाषेचा एक थोर लेखक–किंबहुना महाकवि म्हणून. वुडहौसचें बरेचसें साहित्य काव्याच्या पदवीला बसवण्याजोगें आहे असें तज्ञ म्हणतात. त्याच्या कल्पनेच्या भराऱ्या, उपमा–उत्प्रेक्षादिकांत त्यानें रंगविलेलीं शेकडों शब्दचित्रें व त्यानें निर्माण केलेल्या कांहीं अमर व्यक्ति पाहून त्याची तुलना शेक्सपिअर व होमर यांच्याशी करणारे टीकाकार आहेत. नाट्यसमीक्षक जेम्स ॲगेटनें वुडहौसला 'कधाकधीं तर शेक्सपिअरपेक्षाही महान्' म्हटलें आहे. ऑक्सफर्डचे इंग्लिशचे प्रोफेसर सेंट्सबरी यांनी एकदा लिहिलें की "वुडहौस न आवडणारे लोक आहेत म्हणतात, तसे कोणी असलेच, तर त्या आनंदाला मुकण्याची शिक्षा त्यांनी त्यांनींच ओढवून घेतली आहे असें म्हणावें लागेल." हिलेअर बेलॉक या नावाजलेल्या निबंधकारानें चौतीस सालीं वुडहौसला, हयात इंग्रजी लेखकांत सर्वोत्तम, आम्हा धंदेवाईक लेखकांच्या अग्रस्थानी' असें, गौरविलें, तर एल. ए. जी. स्ट्रॉंग या कथालेखकानें त्याला भाषाप्रभु म्हटलें आहे. तेवीस वर्षांपूर्वी ऑक्सफर्ड विद्यापीठानें डि. लिट ही सन्मान्य पदवी त्याला समारंभपूर्वक दिली. जॉर्ज ऑर्वेल या कादंबरीकारानें वुडहौसवर एक मनोविश्लेषणात्मक निबंध लिहून त्याच्या प्रतिभेची मीमांसा केली आहे.



वुडहौसला एवढें लोकोत्तर यश कसें मिळालें याचा शोध घेताना अस्बॉर्ननें वुडहौसच्या लेखनातलेच पुरावे दाखवून लेखकाच्या जीवनातल्या घटना त्याच्या कृतींतून कशा प्रतिबिंबित होतात ते विशद केलें आहे. त्याच्या शाळेतलें जीवन व त्यावयातील वाचन त्याच्या शालेय गोष्टींतच नव्हे तर नंतरच्या सर्व पुस्तकांतून डोकावतात. सटरफटर वाचनाचे सर्वसामान्य संस्कार पूर्णपणें भिनवून घेऊन, तसल्या कडब्या साहित्यातूनच तो आपल्या पुस्तकाचा खमंग मसाला तयार करतो. रोजच्या वाचनातल्या मजकुरातूनच तो चर्वित शब्दप्रयोग व घट्टे पडलेले संकेत उचलतो आणि त्यांची विपरित रचना करून हांसवतो. इंग्रजी भाषेला त्यानें वाटेल ती कसरत करायला लावलें आहे. विद्यार्थीदशेंत जबरदस्तीनें झालेला बायबल–ग्रीक–लॅटिनचा अभ्यास व शेक्स्पीअरच्या ठराविक नाटकाचे पाठ, त्याचप्रमाणें त्या वयांत हौसेनें वाचलेल्या किप्लिंग, हॅंटी, कॉनन डॉईल सारख्यांच्या साहसकथा, आणि नंतर वयांत आल्यावर वाचलेल्या सवंग रोमांचकारी रहस्यकथा, या सर्वांच्या भाषाचा वाटेल तसा उपयोग करून वुडहौसनें लहरी अमीर उमराव, भोळे धर्मगुरू, प्रेमांत पडणारे श्रीमंत, रिकामटेकडे घरगुती नोकर, फाजिल हुषार सेक्रेटरी, वेंधळे पोलीस, दुष्ट मॅजिस्ट्रेट, इमानी-चोर, बेइमान सावकार, बिनडोक पहिलवान असे असंख्य गमतीदार माणसांचे नमुने नानाप्रकारच्या हास्यास्पद घटनांतून दाखवून एका असंभवनीय पण अद्भुत आनंददायी सृष्टींत वाचकाला वरचेवर नेऊन सोडलेलें आहे. त्याच्या सर्व नायिका एकजात आकर्षक आहेत–त्यांतल्या कांहीं शिष्ट व कांहीं इरसालहि आहेत. त्याचे नायक पुष्कळदां जेमतेम सुबुद्ध पण अंगापिंडानें मजबूत असतात, तर कधीं कधीं श्रीमंत व सद्हेतूनें घोटाळे करणारे निर्बुद्ध निरुद्योगी असतात. बहुतेकाचा मानसिक विकास पंधरा वर्षें वयापलीकडे गेलेला नसतो, पण तरि ते वाचकाला आवडतात. वुडहौसचे बावीस

अनुक्रमणिका

' बैला ' ला.... हो ऽऽ !



हय्या हय्याँ......व्हीकु व्हीकु

' झोपड्या ' य्या.... झोपड्या ! !




लोकांचे नमुनेहि वाचकाला आवडतात कारण ते हांसवतात. सर्वस्वीं तिरस्करणीय असें एकहि व्यक्तिचित्र वुडहौसनें रंगविलें नाहीं, त्याच प्रमाणें कधीं त्यानें सद्भिरुचींची मर्यादाहि ओलांडली नाही.

अस्त्रॉर्नेनें वुडहौसच्या पुस्तकांतून नमुनेदार व्यक्तिचित्रें म्हणून निवडलेल्यांपैकीं पहिला स्मिथ (आपल्या नांवातलें पहिलें अक्षर 'पी' असून तें सायकालॉजी किंवा 'थायसिस' या शब्दाप्रमाणें अनुच्चारित आहे हा खुलासा तो नेहमीं करतो). त्यानें शाळकरी कादंबरीत प्रथम प्रवेश करून पुढें हौशी डिटेक्टिव्ह व नंतर धाडसी पत्रकार या भूमिका केल्या आहेत. उंची पोशाख, गंभीर वागणूक व अखंड बडबड – विशेषतः स्वतःच्या करमणुकीसाठीं या स्मिथच्या विशेष गोष्टी. हाच पुढें चिरतरुण लॉर्ड इकेन्हॅमच्या रुपानें पुनः अवतरून तीन पुस्तकांत धुमाकूळ उडवतो. दुसरी व्यक्ति युक्रिज–शाळेतून हांकून दिलेला व जुन्यीं शाळासोबत्यांच्या जागांचा, कपड्यांचा आणि नांवाचां बेधडक उपयोग करून घेणारा; कडक शिस्तीच्या आत्येचा एकुलता एक वारस पण तिच्याही घरांतून वरचेवर हकालपट्टी भोगणारा, अफाट कल्पना, अव्यवहारी बेत आणि अमूप उत्साह, बेप्र बहुतेक गचाळ, आणि सदा पैशाच्या निकडीत, मित्रांना वरचेवर तोंडघशी पाडणारा—तरीहि कित्येक ठिकाणीं लोकप्रिय. तिसरी व्यक्ति बर्टी वूस्टर सुखवस्तु, सद्हेतुधारी पण बुद्धीच्या बाबतीत फारच सुमार. ड्रोन्स क्लबचा (किंवा मधुमक्षसंघाचा) सदस्य–जेथें एकजात सगळे निरुद्योगी व बड्या घराण्यातले निर्बुद्ध आहेत. बर्टी नेहमीं मित्रांना मदत करायला तयार असतो, पुष्कळदां तो आपल्याच गुणानें कसल्या तरी भानगडीत सांपडतो, पण त्याचा इमानी ' व्हॅले ' किंवा तैनाती सेवक जीव्हज त्याला सर्व संकटातून नेहमी सोडवतो. जीव्हज् हा नोकर वुडहौसच्या सर्व पात्रांत सर्वश्रेष्ठ बुद्धिमत्तेचा व कर्तुंमकर्तुमन्यथा कर्तुम् समर्थ असा पुरुष आहे. त्याची भाषा टाइम्सच्या अग्रलेखासारखी असते, तो कर्तव्यें उत्तम प्रकारें पार पाडतो, कधीं डगमगत नाहीं, कधीं गाणेंहि गुणगुणत नाहीं, मोठ्या मुष्किलीनें कधींतरी स्मित करतो, येतो केव्हां नी जातो केव्हां तें कळत नाहीं, पण जरुरीच्या वेळीं नेहमीं तयार असतो. बेलॉकच्या मतें जीव्हज् हें व्यक्तिचित्रण इतकें अमर आहे कीं नंतरच्या पिढ्यांना आणि परदेशांना आजच्या ब्रिटनचें दर्शन जीव्हज्विना अपुरें ठरेल.

ब्लॅंडिंग्ज कॅसल या किल्लेवजा बंगल्यांत व त्या भोंवतालच्या उद्यानांत वुडहौसच्या बऱ्याच कादंबऱ्या रमल्या आहेत. तेथील धनी लॉर्ड एम्सवर्थ, त्याचें विस्तीर्ण कुटुंब, नोकरचाकर, पाहुणे आणि उपरे हीं पात्रें जो धिंगाणा घालतात तो पुन्हापुन्हा वेगवेगळ्या पुस्तकांतून वाचून कंटाळा तर येत नाहींच, उलट अगो-

' विळ्या ' नें कापलें, ' कणीस ' पेरलें...



' उगवत्या सूर्या ' कडे.... पाठ !



अनुक्रमणिका

ऋद्धि सिद्धींच्या भांडणात 'हत्ती' चे हाल...!



' सिंह ' गर्जना !



मत नको पण अत्रे आवरं

दरचें पुस्तक काढून पुन्हां एकदां वाचावेंसें वाटतें. घटनांत व पात्रांत पुनरुक्ति होते, पण तीहि वाचकांना हवी असते. अपेक्षित हास्य-कारक प्रसंग अपेक्षित रीतीनें पण अनपेक्षित वैचित्र्यानें पार पडलेले वाचकांना आवडतात. गॉल्फ या खेळाविषयींच्या गोष्टी सांगणारा क्लबचा सगळ्यांत जुना मेंबर किंवा 'बार'मधें जमलेल्या श्रोतृवृंदाला आपल्या अगणित पुतण्यांबद्दल हकीकती सांगणारा मलिनर हे थापा देत असतील पण त्या थापा इतकी गोडी लावतात कीं ऐकणाराला खऱ्याखोट्याची विशेषशी पर्वा वाटत नाहीं. मधुमक्ष संघातले सदस्य बऱ्यावाईट कहाण्या सांगतात, त्यातल्या घटना विस्मयजनक आणि निवेदनपद्धति अजोड असते. पण स्वतः वुडहौसला मात्र कांहीं सांगायचें नाहीं, शिकवायचें नाहीं, संदेश द्यायचा नाहीं, त्याला फक्त गंमत करायची आहे.

वुडहौसविषयक अशी तीन चरित्रांसारखीं पुस्तकें निघालीं. त्यानें आपला लेखकमित्र बिल टाउन्सेण्ड याला बत्तीस वर्षे लिहिलेल्या पत्रांना संदर्भवार मजकूर जोडून जें पहिलें चरित्रवजा पुस्तक निघालें त्याचें नांव वुडहौसनें ठेवलें ' पर्फॉर्मिंग फ्ली ' ( कसरत करणारी उ. ) त्याला कारण असें कीं जर्मनीनें जेव्हां फ्रान्स व्यापला तेव्हां वुडहौस फ्रान्समध्यें लटुके येथें जर्मनांच्या हातीं सांपडला, त्याला फक्त एक सूटकेस घेऊं देण्यांत आली ( तेव्हां त्यानें वाचनासाठीं संपूर्ण शेक्सिपअर हे एकच पुस्तक बरोबर घेतले ) व त्याची रवानगी तुरुंगात झाली. तेथें कांहीं दिवस त्याला फरशीवर झोंपावें लागलें व इतर हाल होऊन त्याचें वजन ५२ पौन्डानीं कमी झालें. अखेर त्याची योग्यता लक्षांत येऊन नाझींनी त्याला थोड्या आरामांत कैदेंत ठेवलें. त्याचवेळीं त्याच्याकडून ब्रिटनला उद्देशून रेडिओवर भाषण झालें, फार नाहीं, ' येथें परिस्थिती इतकी वाईट नाहीं, आमचे हाल करीत नाहींत, मीं माझें काम करीत आहे ' असें कांहींतरी तो सहज खेळकर पद्धतीनें बोलला. दुर्दैवानें त्याच वेळीं लंडनवर हिटलरची विमानें अभूतपूर्व अग्निवर्षाव करीत होतीं हें वुडहौसला माहीत नव्हतें. त्याच्या देशांतच त्याच्याबद्दल चीड उत्पन्न झाली, तो देशद्रोही वाटूं लागला. त्याच्याबद्दल गवगवा वाढला. सीऑन ओकेसी या आयरिश नाटककाराला इंग्लण्डचा पुळका येऊन त्यानें वुडहौसचा धिःकार करणारें पत्र लिहून त्यांत त्याला ' इंग्रजी साहित्यांतील कसरत करणारी ऊ ' म्हटलें. या गहजबाची वुडहौसला कल्पना नव्हती. जर्मन बंदीखान्यातून सुटका झाल्यानंतर फ्रेंचांनी त्याला फितुर म्हणून गोळी घालून ठार मारण्याची तयारी

[ पान ५८ वर ]

झुजूमुजू झालं, वर आलं शेंडें ' नक्षत्र '



' दीप ' ज्योति मतोस्तु ते !





**' भान हरपलें '**

क्रु. सा. न. वि. वि.

आपला मुक्त गोमंतक विशेषांक आज नजरेस आला आणि गोमंतकाबद्दल जें म्हणून जाणून घेण्याची इच्छा होती त्याचे मुख-पृष्ठावरच सुरम्य दर्शन झालें. गोमंतकांतील लाखों लोकांची कल्पना भावना इथें साकार झालेली दिसली. ही भावना नितांत मुग्धा आहे. ही कृत्रिम नाहीं. नटलेली नाहीं. नित्यनेम म्हणून तिनें केशरचना केली आहे. कुंकुमरेखा ओढिली आहे, काजळकांठ भरला आहे. पण हे करतांना तिला देवाची जाणीव नाहीं. भालप्रदेशावर दोनचार केंस चुकारपणें निसटत आहेत, कानापुढें एक बट घसरलेली आहे, पण तिला याची जाणीव नाहीं. कशी असेल ? अंतरींच्या भावांनाच मोल असतें अशी तिची मुग्ध धारणा आहे ना ?

या भावनेला अजून नवें वारें लागलेलें नाहीं. आपली जुनी परंपराच तिला रुचते. तिनें कपाळावर ठसठशीत चिरी लाविली आहे कानांत बुगडी चढविली आहे. नाकांत सुकलें मिरविलें आहे.

ही विशालनयना भावना जणूं विधीनें स्वकरें निर्मिली अशी सुंदरी आहे. पण या जाणिवेनें ती प्रमत्त प्रमदा झालेली नाहीं. शालीनता हेंच नारींचें सौंदर्य असें ती मानते. एक तीळ गोंधून घेतला की कांहींजणींस किती ताठा येतो. पण या रमणीला दृष्ट लागूं नये एका वामांगीच विधीनें पांच तीळ दिले आहेत याची तिला जाणीवहि नाहीं. यांतील दोन टळक तिळांचें तेवढें अलंकार गालांवर आणि हनूवर मिरवावे, दुसरे तीन बारीक [illegible] पल्या सौंदर्याचें गुपीत म्हणून तीळ [illegible] कांताच्या अंगराग्रांत लपवून [illegible], ओठांनी त्या त्या अंगांचा अंगराग पुसटला कीं त्यांच्या दर्शनानें तो कसा वेडावेल हें पहावें. असा मायावी विचार तिच्या मनांतहि नाहीं कुंकवाचा एक बिंदू चिरी रेखाटतांना भलतीकडेच लागलेला आहे त्याचीहि या मुग्धेला जाणीव नाहीं.

चिरकाल उत्सुकतेनें अपेक्षिलेलें स्वातंत्र्य-सूर्यरुपी कांत दर्शनाचें भाग्य इथें समोर उभें आहे. एखादी चंचला असती तर ती धीटा-ईनें मान वर करून त्या भाग्याकडे बघती. एकदा कटाक्ष टाकून त्याला घायाळ करती विभ्रमानीं त्याला जिंकून घेती. पण या मुग्धेनें मान वर केलेली नाहीं. झिरझिरीत ओढणीचें खोटेंच घुंगट घ्यावें आणि त्या आडून आक्रमक कटाक्ष टाकत तें दूर करावयास कांतास आवाहन द्यावें अशी हिची संस्कृतीच नाहीं. आत्मार्पणांत आत्मानंद मानणारी हिची संस्कृति. त्यामुळें तिची मान वांकलेली आहे. नजर खालीं आहे. नयन एवढे विशाल आहेत कीं ते आव्हानाच्या जहरानें भरले तर त्रिभुवनाला घायाळ करतील. पण हिच्या नयनांत भरलें आहे नुसतें अथांग भावामृत. तें अथांग आहे म्हणूनच शांत आहे. त्यांत उन्मादाचा एवढाहि तरंग नाहीं. युगायुगांची शुचिता, युगायुगांचें शील, युगायुगांचें पावित्र्य, युगायुगांचें मांगल्य, किंवा युगायुगांची आर्यता कणाकणानें ओथंबून या नयनांत एकवटली आहे. अनंत अवधीच्या अत्याचारांतून कांताच्या पूजेसाठीं अबाधीत ठेवलेलें सारें अपाप कौमार्य आतां साफल्याचा क्षण आला म्हणून जरा अधीरलें आहे, बावरलें आहे. ही बावरी अधीरताहि त्या नयनांच्या काजळकाठांत ओथंबली आहे.

कांत पुढें उभा आहे. पण मान वर करणार नाहीं; नजरेला नजर भिडविणें जमणार नाहीं; मुखांतून शब्द तर येणारच नाहीं पण असें प्रदर्शन आपल्या हातून न घडलें तरी आपलें मन जवळिकीसाठीं, आत्मार्पणासाठी उत्फुल्ल आहे हें आपला कांत जाणेल ना ! हा कांत मनाजोगा आहे. किती दिवस याची प्राप्ती व्हावी म्हणून आपण गौर पूजिली आहे. याची आपली जोड जमेल अशी कधीं खात्री वाटायची. पण अनेकदां भीतीहि वाटा-यची कीं ती खरोखरच जुळेल ना ? त्यामुळें तो आतां असा अनपेक्षितपणें झपकन पुढें ठाकला तेव्हां आपला किती गोंधळ उडाला याचें जें रूप मनोमन कल्पिलें त्याहून किती अधिक दिव्य हें रूप. नयन उचलून पहायचा धीरच होत नाहीं. हृदय भरून आलें आहे. ही भावना कशी वर्णू. ती अशी असते हें आपणास तरी कुठें माहीत होतें ! केवढें हें अहो भाग्य ! देवांचा निरोप घेऊन नलराज जेव्हां पुढें ठाकला तेव्हां दमयंतीला असेंच का झालें ? तो यदुनाथ देवीच्या मूर्तीमागून अचानक प्रकट झाला तेव्हां रुक्मिणीला असेंच का झालें ? काय जाणू बाई ! आप-णास काय होत आहे आणि कसें होत आहे हेंच कळत नाहीं खरें. आपला हा कांत हें जाणेल ना ? अशा विचारांचा संभ्रम हिच्या नयनांत आहे. जुन्या परंपरेंतील मुग्ध नवो-ढेच्या हृदयांत जे जे म्हणून पवित्र आणि शालीन भाव असतात ते ते सारे इथें साकार झाले आहेत. निळ्या रंगाच्या छटांछटांतून मुग्ध भावांचे सागर ओथंबले आहेत.

अंतरींचे भाव नयनी भरले तरी ते कांतास दिसणार–त्यानें आपली हनुवटी धरली, मान उचलली, दृष्टिभेट अटळ केली म्हणजेच. त्याक्षणीं युगांच्या गोष्टी बोलल्या जातील. पण ही दृष्टीभेट होईपर्यंत जो काळ जाईल त्यांतील क्षण न् क्षण उत्कंठेमुळें युगांसारखाच भासेल-या कालांत आपले भाव प्रकट करावे म्हणून तिनें जणूं आपलें हृदयच पणतीच्या मंगल ज्योतीच्या रूपानें आपल्या हातांत धरलें आहे तिची नजर या ज्योतीवरच एकाग्र झाली आहे. तिच्या हृदयातील प्रीतीची ओढ या ज्योती-च्या लाल रंगांत, त्या प्रीतीची सुवर्णदीप्ती या ज्योतीच्या पीत रंगांत आणि त्या प्रीतीचें पावित्र्य या ज्योतीच्या शुभ्र रंगांत साकार झालेली आहे. ओढ आणि दीप्ती यांना वेढून पावित्र्याचीच शलाका कांत पूजनासाठीं वर चढत आहे. जसे या भाव-नेचें अंतर कातरतेने कांपत आहे तशीच

[ पान ५८ वर ]


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



# लाडक्या परीट

'हे...हे...हे...हे ऽ ऽ बगा भाकरीचा टाइम हुता. काइतरी बारा वाजल्या असत्याल. मजी रातचं न्हाई हां! सावल्या पार पायांत आल्या हुत्या. समदं कसं निवांत हुतं, आन् म्यां सायबाकडं गेलों ...'

'कुठला साहेब रे?'

'ह्ये आपलं विंजिणेरसायेब. त्ये डिचकं. त्ये न्हवतंच घरांत. त्याची बाईल हुती मातर. चुलीलगत काइतरी घसा घसा घाशीत हुती. म्यां दार लोटलं न् वराडलो, 'बाई, कापडं काढा, म्यां आलूय्....' आन् ती बयाबी कशी म्हनती, 'आले, रे, आले. थांब कपडे काढते......'

एवढं बोलून लाडक्या खळखळून हंसायचा. वर आढ्याकडं तोंड करून हातांतली तापलेली इस्त्री उभी-तिरकी फिरतां फिरतां सदऱ्यावर किंवा लेहेंग्यावर एक क्षणभर तशीच अटकून पडायची. लाडक्याच्या दुकानांत हास्याचा एकच धबधबा पडायचा. इंजिनीअर साहेबाची नटीसारखी गोरीपान दिसणारी वेष्ट बायको लाडक्याला 'थांब कपडे काढते' म्हणते याचा अर्थ काय? याचा अर्थ तोच! कोपऱ्यांतल्या धुवून आणलेल्या कपड्यांच्या राशींत आम्ही दणादण उड्या घ्यायचों. कसल्या तरी वैतागानं एकमेकांना मिठ्या मारायचों. क्षण दोन क्षण अशा अलौकिक अवस्थेंत जात. मग लाडक्या एकाएक भानावर येई.

'आ...ल्येका, ल्येका, अरं कापडं जळलीं...!'

असं म्हणून पुन्हां इस्त्रीवर जोर देऊन ती तो उचली. दणकन् लोखंडी कड्यावर ठेवी. पुन्हां आमचे संवाद चालू राहात. पुनः दुसरा प्रसंग. हें सारं नित्याचं होतं.

माझ्या गांवच्या अग्नेय दिशेला कोंडवं नांवाचं एक खेडं आहे. कांहीं तरी पांच सहा कोस असेल. रहदारीच्या हम रस्त्याला सोडून थोडसं आंत वसलेलं हें गांव मोठं सुरेख आहे. डोंगराच्या कुशींत झोपलेल्या या गांवांतली ती गर्द झाडी, गांवाला मुरगाळा घालून गेलेली नदी, नदीवरचा बांधीव घाट, त्यालाच लागून असलेला आभाळांत उंच गेलेला गांवदेवीचा कळस आणि आसपास पसरलेलीं कौलारूं खोपटं. सारं कसं प्रसन्न वाटायचं. गांवची वस्तीहि कांहीं फार नाहीं. सगळा मिळून शंभर एक उंबरा.

लाडक्या परीट हा अप्रतिम माणूस या कोंडव्याचा, पक्का इरसाल. हा 'रंगलाल मानूस' गांवांतील बाया माणसांत रंडीबाज म्हणून नांवलौकीकास आला आहे. भारी चावरट तोंडाचा अन् करणीचा. उंचीनं बुटका आणि अंगानं पातळ असलेला हा 'लाडक्या परीट नदीवर उघड्यानं कापडं बडीवतोय' हें कळल्यावर चांगली दहा बाळंतपणं अनुभवलेली बाईहि नदीवर जायला [दिवस न जातांच] गर्भगळीत होऊन जाई, तर तरण्याताठ्या पोरींचा काय पाड?

*हा ‘ रंगलाल माणूस ’ भारी चावट तोंडाचा अन् करणीचा. उंचीनं बुटका आणि अंगानं पातळ असलेला हा ‘ लाडक्या परीट नदीवर उघड्यानं कापडं बडवीतोय ’ हें कळल्यावर चांगली दहा बाळंतपणं अनुभवलेली बाईहि नदीवर जायला गर्भगळीत होऊन जाई.*

ही गोष्ट खरी असली तरी तिची व्हावी तितकी ‘ अॅडव्हर्टाईज ’ झाली नव्हती. सगळ्यांनाच माहिती होतं असं नाहीं. कांहीं मंडळी अजाण होती. कांहीं जाणकार होते तेहि दांतीं ओठीं गप राहिले. बोलायचं कुणाला न् कसं ? लाडक्याला बोलावं तर तो केव्हां आया बहिणींचा उद्धार करील त्याचा नेम नाहीं. इंगळ्यागत डसला तर सारी जिंदगी लोळा गोळा होऊन पडेल. असा विचार करून जो तो गप्प राहिला. ती गोष्ट मनोमन वागवीत राहिला. त्या नामांकित माणसापासून दोन पावलं दूर राहून ‘ त्याला रामराम ’ घालूं लागला. अस्तनींत असा भडकलेला अग्नी ठेवून गावाचे व्यवहार चालले होते.

लाडक्या तसा एरवीं चांगला माणूस. नडल्या अडल्याला मदत करी. कुणाला गांठीचा पैसाहि तो मोडून देई; तर कुठं मयतीला माणस कमी पडत असलीं तर खांद्यावर गिन्हाईकाचा धुतका टॉवेल टाकून तो आपली हजेरी तिथं लावी. पुढं होऊन सगळं करी. असा हा माणूसकीला धरून वागणारा परीट या एकाच गोष्टींत जरा घसरला होता. फार ‘ कंडाळ ’ माणूस. त्याच्या मनांत एखादी सूरत भरली तर तो ‘ ध्यान ठिवून त्यें पांखरूं काढणार ’ म्हणजे काढणारच.

हा बाकळा माणूस आमच्या गांवांत आला तरी कसा ? त्याची माझी ओळख झाली तरी कशी ?

सकाळची वेळ होती. मी माझीं नित्याचीं कामें उरकून कांहीं-तरी वाचत पडलों होतों. उन्हें चांगली निबर झालीं होतीं. दिवस चढूं लागला होता. तेवढ्यात कुणाची तरी हांक आली,

‘ गोवेकर साहेब हायती कां...? ’

दाव्यावरच्या जनावरागत मी तटकन् उठलों. उघड्या अंगा-नंच बाहेर आला आणि पाहिलं—

चाळीशीच्या आसपास उमर असलेला एक खेडवळ गृहस्थ दाराच्या चौकटींत उभा होता. डोकीला कोचदार लाल पटका, खाली दुटांगी धुतकं धोतर, अंगांत खेडगळ शिलाईचा पण धुतका शर्ट आणि त्यावर फाटका कोट घातलेल्या त्या इसमाकडं मी पाहात राहिलों. अंगलटीन तो बारकुळाच होता. रंगानं काळ्या टार असलेल्या त्याच्या चेहऱ्यावर ओठावरच्या छपरी मिशांमुळें भलताच नेरकेपणा आला होता.

**पद्माकर गोवईकर**

त्याचं माझ्याकडं लक्ष नव्हतं. तो आपल्याच नादांत होता. उन्हांत घाम्याजलेली मान तो खाली वाकून धोतराच्या सोग्यानं खसाखसा पुशीत होता. मीं विचारलं, ‘ कोण हवंय ? ’

‘ हे ऽऽ राम राम...मी कोंडवकर परीट.

मला राम राम करून तो हंसला. पानानं रंगलेल्या तोंडांत सोन्याचं पाणी दिलेला एक दांत लकूकून चमकला.

‘ कांहीं काम आहे कां ? ’ मी

‘ सावकारानं धाडलंय तुमाकडं... ’ तो हातवारे करीत बोलला.

‘ कोण सावकार ? ’ मी उगाचच अडविलें.

त्ये बामण सावकार...’ पटक्यांवरून शेंडीची खूण दाख-विण्यासाठीं त्यानं हात फिरवला.

‘ बामण मीहि आहे.’

‘ त्ये ऽऽ येनवाड बामण त्यो...’

तो मोकळेपणानं हंसला. मलाहि हंसूं आलं. मीं ओळखलं. माझ्या एका स्नेह्यानं त्याला माझ्याकडं पाठवून दिला होता. कायम स्वरूपात आणि धरीं येऊन कपडे घेऊन जाणाऱ्या परटाची मला जरूरी होती. गेले कांहीं दिवस मी त्याच्या शोधात होतो. त्यासाठीं तो आला होता. मग आमचं बोलणं झालं बराच वेळ झालं पण व्यवहार तुटेना. वट्टात कुणींच बोलेना. शवटीं घोळाचं बोलणं थाबलं. रुपये सहावर व्यवहार तुटला व माणूस जोडला. सहा रुपये शेकड्यानं कपडे ठरले. लगोलग मी त्याला कांहीं कपडे काढू-नहि दिले. पायांत वहाण सरकावून आपला लाल शेमला उडवीत उडवत तो चालता झाला. जातां जातां मी त्याला विचारलं, ‘ अरे, नांव काय तुझं ? ’

‘ लाडक्या परीट म्हनत्यात मला ’

सडासंमार्जन केलेल्या आमच्या अंगणांत लालभडक पिचकारी मारून तो निघून गेला.

आमच्या घरावरून जाणारा रस्ता थेट झेंड्यागेटीवरून खालीं जातो. थोडासा उतरता होऊन तो घिसाड्याच्या पाराच्या तिकाट-ण्याला जाऊन मिळतो. तिथून मग तीन रस्ते फुटतात. एक विठो-बाच्या तळाकडं जातो. दुसरा गारेच्या गणपतीकडं जातो. तिसरा वळण मारून खालीं बाजारपेठेंकडे जातो. या वळणावर एक बाम-णाचं दुमजली बैठं घर आहे. रस्त्यालगत असलेल्या या घरांत दुकानासारखं कांहींतरी चालविण्याच्या हेतूनें परशा कासारानं वळणावरची दोन खणाची जागा भाड्यानें घेतली आहे. आणि तिथं तो प्रांतदिनी कांही बांगड्या पिंचवतोहि. परशा कासार वयाबाहेर गेला असला तरी पिकल्या पानांतला हिरवटपणा अजून ताजा आहे. नंबरचा बेरका माणूस. या कासाराच्या दुकानाला मध्येंच फळ्या ठोकल्यात आणि पलीकडे आणखी दोन खणाच्या जागेंत कोंडवेकर परटानं आपला धंदा मांडलाय्. पातळ, झंपरापासून लंगोटापर्यंत कोपऱ्यांत राशीनं कपडे पडलेले असतात आणि दारालगतच ठेवलेल्या खुर्चीशेजारच्या टेबलाशीं उभं







राहून लाडक्या 'कापडांना इस्तरी' करीत असतो. अंगांत फक्त एक दंडकं अडकविलेलं असतं. धगधगलेली इस्त्री कपड्यावरून फिरत असते. लाडक्याच्या काळ्या दंडावरच्या वेडक्या मागंपुढं हालत असतात. आणि तोंडांतल्या पानाचा मुखरस सांभाळत पार्टीशनच्या पलिकडल्या कासाराशीं चावट गप्पा मारीत लाडक्या काम करीत असतो.

लाडक्याच्या दुकानांतील लायटीचं तात्पुरतं कनेक्शन परशा कासाराच्या दुकानांतूनच घेतल्यामुळें लाडक्याच्या 'बलची कळ' कासाराच्याच दुकानात होती. परटाला जरूर पडंल तेव्हां, 'हेऽऽ कासार अरं, कळ दाब' म्हणून ओरडून तो दिवा लावायला सांगे. कासार उगाचच दहा पांच वेळा कळ खालीवर करून दिवा लावे.

कासार त्या 'कळीचा दुसराहि' एक उपयोग करी, महादेवांच्या देवळाकडनं पोरींबाळी पाण्याच्या घागरी कमरेवर लादून आल्या म्हणजे त्या कासाराला दिसत. दाराशींच गुढगं वर करून त्याला हाताचा मिटा घालून, तक्याला टेकून बसलेला कासार चटकन् आपली बैठक सरळ करी. आणि हात लांबवून परटाच्या दिव्याची कळ तो धाऱ्याच वेळ खालींवर करी. लाडक्याला तो इशारा समजे. तो पलिकडून आरडे 'का रं, कासारा...'

'आऽ ल्येका घागरी आल्या...' कासार आपल्या कंडाळ आवाजांत सांग.

'भरल्याल्याच हायती कां रिकाम्या...' लाडक्या कोटी करे.

'हायेत, रिकाम्याच हायेत...'

मग कांहीं वेळ तसाच जाई. पोरी बाळी त्यांच्या दुकानावरून जाऊं लागत. त्याचा किनरा स्वर लाडक्याच्या कानावर जाई. त्यांच्या कमरेवरल्या घागरींतल्या पाण्याचा चळक् चळक् आवाज त्याला ऐकू जाई. अन् मग परटाच्या दुकानात काही तरी धडपड व्हायची. कांहीं तरी खडखडायचं आणि परीट बोंब मारायचा—

'हे....हे....हे...हे....हे...हेऽऽ पोळलं...पोळलं...पोळलं, निसती आग झाली...'

मग त्या जागेत एकच खसखस पिकायची. परशा कासार तोंडाची बचाळी फाकडून खो खो करून हंसत राहायाचा. समोरचा साध्या वाणगटहि वजन मापीत आपल्या गोबऱ्या गालांतून तेलकट हास्य बाहेर फेकायचा. पोरीबाळींहि लाजून एकमेकांकडे पहात हसत पाऊल उचलायच्या. आपापल्या मार्गानें निघून जायच्या. कासार मग परटाला टाळी देई. पोरींना 'जाम हांसावलं' म्हणून परटाला च्यापाणी होई.

त्या उभयतांचा हा 'चावटपना' आमच्यापैकी कुणालाच ठाऊक नव्हता. लोकाना तर अजूनहि माहित नाहीं. लोक अजूनहि परटाला केवळ एक धोबी, एक गरीब धोबी समजतात.

हळुंहळुं आमचं लाडक्याकडं जाणं येणं चालूं झालं. उठबस चालूं झाली. मी, चितळ्याचा 'लड्ड गज्या' आणि सावकार धांदरफळेचं शेंडेफळ जातां येतां परटाकडे टेकूं लागलों. गांवांतल्या उंडग्या बायाच्या गोष्टी मुद्दाम काढूं लागलों. हळुंहळुं आम्हाला परटाच्या टायली कळूं लागल्या.

धांदरफळेचा पोरगा तंबाखू खायचा. परटाच्या दुकानीं जाऊन बसल्यावर त्या दोघाची तंबाखूचा लेणदेणाण होई. धांदरफळे लाडक्याच्या तळ हातावर नुसती तंबाखू ठेवी. तेव्हा परीट म्हणायचा, 'आई दिलीस आन् बाप कुनी द्यायचा ?'

मग धांदरफळे त्याला चुन्याचं नख द्यायचा. मळलेल्या तंबाखूची फक्की दाढेला लावून लाडक्या कपड्यावरून इस्त्री फिरवात राही. मग गोष्टीना रंग भरूं लागे. तो शेंगावाला वेद्य त्या 'मंदी वार्शीकरवर' कसा जीव टाकतो, मुन्शीपाल्टीत नवीन आलेल्या चीफ हाफीसराचं सेंग त्या खाणावळवालीशी कस आहे. आणि बाजार पेठेतला एक नाटकी डॉक्टर एका 'पब्लिक मुतारी' वर कसा लट्टु झाला आहे. या साऱ्या कथा प्रथम आम्हाला लाडक्या परटाकडून कळल्या. अगदी जागतिक रहस्य असल्यासारख्या त्या गोष्टी लाडक्या आम्हाला खाजगी आवाजात सांगे आम्हाला नवल वाटायचं. लाडक्याला या गोष्टी कळतात कशा या प्रश्नानं आम्ही बेचैन होऊन जात असूं......

आम्हीं त्याला विचारायचों, "लाडक्या, तुला कोण सांगतं रे हें सगळं. कस कळलं तुला ?"

यावर लाडक्या कुत्रं भुंकतं तसा भुंकून हंसायचा. हातांतली इस्त्री टेबलावरच्या लोखंडी कड्यावर विसावयाचा. तोंडात बराच काळ ठेवलेला तंबाखूचा चोथा डाव्या हातावर थुंकून तो तो बाहेर फेकून देई आणि मोकळ्या मनानं आणि तोंडानं बोले,

'यार तुमी खुळं हात. आरं, कापडाआड जग नागवं. लोकांची कापडं माझ्याकडं आल्या मला त्यांचं नागवंपन दिसतं'

"लाडक्या, सरळ सांग. आडवं बोलूं नकोस"

'तसं न्हाई गड्या तें. अरं, ततं पायजेल जातीचं, लेकांनो, आमी जातीचं परीट हाय. समद्या गावाचा आमी धुना करतो. पयलं आमाला दुसऱ्याचं डाग दिसत्यात. अरं, परनू रामचंद्रापासून आमी हेच करीत आलूं...'

एकमेकांकडे बघत बसण्याखेरीज आम्ही तरी काय करणार ! ताठ कमरेनं लाडक्या कपड्यावर इस्त्री फिरवित राही. •



अनुक्रमणिका

लाडक्या आपल्या धंद्यांतहि चांगला तयार झाला होता. दुसऱ्याचे कपडे आपल्याकडे फक्त धुवायला येतात. हें विसरून जाई. चार–पांच दिवसांत आणतो म्हणून जो ते न्यायचा पंधरा दिवस आपल्या गांवीच गुल् व्हायचा. गिऱ्हाईक बोंबलून बोंबलून थकल्यावर एक दिवस याच्या दुकानाचं टाळं निघालेलं दिसायचं. मग त्या दिवशीं त्याच्या दुकानांत नुसती होळी साजरी होत असे. गुजराचा जीवनदास, खाटकाचा म्हम्या आणि खाऱ्या विहिरीकडला महाद्या बामण, सारे लाडक्याच्या खरखरलेल्या इस्त्रीभोंवती बोंब मारायला येत. हा मिस्किल बगळा गोड बोलून त्यांना परतवी. गुजराच्या टकल्या जीवन्याला लाडक्या उजव्या हाताची मूठ हवेंत तिरकी मागेंपुढें करीत, 'सारो छे ना?' म्हणून हंसवी. दुकानांतलं इतर गिऱ्हाईक त्याच्या त्या अभिनयाला खदखदून हंसे गुजर आंशाळून घरीं परते. तोंवर खाटीक दणदण पावलं वाजवीत दुकानच्या लाकडी फळ्या चढे.

'अबे, परीटके बच्चे, हमारे कपडे लेकर हमको नंगा करता क्या?'

'अरं, तुमको नंगा करके हमको क्या फायदा!' लाडक्या त्याला उत्तर द्यायचा. खाटकाचं लग्न होऊन दोन वर्षं झालीं तरी त्याला मूलबाळ कांहीच होत नव्हतं. लाडक्याला त्याचं हे वैगुण्य माहित होतं. तो शांतपणें विचारी,

'हे खाटीक, अरं, शादीशुदा होकर तुझे कितना वरीस लग्या?'

'पयले आपुन कापडं मांगते...' खाटीक व्यवहाराचा तुकडा पाडायला बघे.

'अरं, ये मागावलेत. पयले बोल तो. कितना वरीस हुआ?'

'हुआ दोन साल'

'अरं, साले, दो सालमे तुमनें एक छोकरभी निकाला नहीं, आन् दोन सालमें तुमी घान केलेला कापडं आमी चार दिसात कशी काढायचा!'

दुकानात एकच कल्लोळ माजे. खाटीक आपला पाय तेथून काढता घई. कांहीतरी पुटपुटत तिथून निघून जाई. आणि त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात लाडक्या बडबडायचा—,

'कसा थुका लगाया साले, पैसं द्याला नगंत काय!'

क्वचित् एखादे वेळीं जोशी बामनाची कॉलेजांत जाणारी पोर कपड्याबद्दल तक्रार घेऊन यायची. तिला कपडं भारी स्वच्छ लागत. पाळं लाडक्याच्या पुढ्यात टाकून ती फणफणत राही. लाडक्या मुक्यानं आपलं काम करीत राही. शेवटी जोशाची पोर चिडून म्हणे, 'कपड्याना साबणबिबण तरी लावतोस कीं नाही रे......?'

यावर लाडक्या घट्ट तोंडानं हंसे काम थांबवी. पानाची जमलेली भट्टी रस्त्यावर थुंकून साधूसारखा चेहरा करून तो तिला सांगे–

'म्हाई निरमळ जीवन
अगं काय करील साबन......'

आणि दोन्ही हाताचे तळवे तोंडावर ठेऊन तो चहाला उकळी फुटते तसा हंसत राही. पलिकडं जोशा कासार खो खो





अनुक्रमणिका

करून हंसे 'वा : ! भले, भले, तुकोबा' म्हणून ओरडे. कारण हें सारं त्यानंच शिकविलेलं असतं. जोशीबाई 'हलकट, मेला' वगैरे स्त्रैण शब्द पुरुषी आवाजांत पुटपुटत लाकडी जिन्याच्या फळ्या उतरत.

असा हा मिष्ट भाषणी लाडक्या प्रथम आमच्या गांवीं एका गाढवावर कपडे लादून आला होता. पण आज तो एका 'फिलिप्स' चा मालक झाला आहे. त्या सायकलवर कपड्यांचीं गाठोळीं बांधून लाडक्या आपल्या गांवच्या नदीवर तीं धुवायला घेऊन जाई. दिवस दिवस पाण्यात उभं राहून हजार बाराशे कपडे तो एकटा बडवी. कंबरडं मोडेपर्यंत तो कष्ट करी. कामाचा रेंदा पाडे. कपडे बडव, ते वाळत टाक आणि वाळल्यावर ते पुन्हा गोळा करून त्याचा गाठोडा बांध हे सगळं लाडक्या एकटा करात असे. अडल्या ठेवावा तर त्याला काही रोजगार द्यावा लागणार. लाडक्याला तें परवडणारं नव्हतं. त्याची बायको भट्ट्या लावी अन् बाकीचे सारे सोपस्कार लाडक्या एकटा करी. आठवड्यात दोन भट्ट्या लावून धुतलेले कपडे तो आमच्या गावी घेऊन येई. दिवस दिवस टेबलापाशी उभं राहून तो त्यांना इस्त्री करी, व ज्याचे त्याचे कपडे तो दिवस मावळायला वेळी अवेळी घरात आणून टाकी. मग रात्री लालभडक पटका त्यावर कुठल्या तरी गिऱ्हाइकाचा धुतलेला कापडं आणि तोंडात मसालापान भरून लाडक्या कुठं तरी 'जनावर' घेऊन घाटाच्या थट्टीत 'दवानंद कसं जमावतोय' तें बघायला राजाच्या खळ्याला जाई......

आज लाडक्याला गाव सोडायला उशीर झाला होता. डोंगरापलिकडं दिवस ठार झाला होता. सांज झाली होती. उन्ह, सावल्या रंगाळून रंगाळून निघून गेल्या होत्या. आभाळ हळुहळु उजळूं लागलं होतं नदीवरनं कापडं गोळा करायला वेळ झाला बरं, कापडाचा गाठोडा बांधून घाईघाईनं तो घरी भाकरी न्यायला आला तर भाकरीचा पत्ता कुठाय? लक्षुमी बाहेर बसलेली. स्वतःच्याच हातानं लाडक्याला आठ-दहा भाकऱ्या बडवाव्या लागल्या. त्यावर काहीतरी कोरड्यास करून घेऊन त्यानं घाईघाईनं पायंड्यावर पाय मारला 'लेट झाला, लेट झाला' म्हणत त्यानं गाव सोडलं. गांव सुटलं तेव्हा दिवस डोंगराआड झाला होता.

मधनंच गाडी रस्त्यावरनं सायकल आडवी घालून लाडक्या हमरस्त्याला येऊन मिळाला. रस्ता आता शांत होता. बाजार करी मंडळी केव्हाच घराकडं परतली होती. वडाच्या झाडावर कुठं तरी दोन-चार कावळे काकलत होते. बाकी चिटपाखरूसुद्धा रस्त्यावर नव्हतं वडाच्या आणि चिंचाच्या झाडांच्या दोन रांगांमधून लाडक्या कमरेत वाकून सायकल हाणत होता त्याच्या बुडाखाली सीट करकरत होती आणि हँडलवरचा कपड्याचा भलं मोठं दोन गाठोडीमागं पुढं डुचमळत होती. बोल बोल म्हणता लाडक्यानं फलटण नाकं मागं टाकलं. आणि तो मोळ्याच्या ओढ्यावर आला.

मोळ्याच्या ओढ्यावर जरा दम खाऊन गाव जवळ करावा असा विचार करून लाडक्या सायकलवरून उतरला. रस्त्याला सोडून असलेल्या एका झाडाला त्यानं सायकल टेकवली आणि डोईवरला पटका काढून तो धोतराच्या सोग्यानं तो घाम पुसूं लागला.

पुढं ओढा खळाळत होता. आणि फर्लांगभर दूर असलेल्या ओढ्यावरच्या वस्तीत आतां दिवेलागण झाली होती कुठल्यातरी खोपटात पोरं किंचाळत होतीं. कुणीतरी शिव्या घालत होतं. कुठून तरी जात्याची घर घर ऐकू येत होती. कुठलातरी किनरा स्वर आल्या माहेराची वाट चालत होता. आणि एकाएक लाडक्याला ओढ्यावरून कापडं बडवल्याचा आवाज आला. डोक्यावरला पटका बांधतां बांधतां लाडक्या बावचळला. कानोसा घेऊं लागला.

'आत्ता इच्या, ह्या वकताला कोन कपडं बडीवतंय्!'

असं स्वतःशीच म्हणत लाडक्या परीट आढ्यातल्या खडकाच्या दिशेनं चालू लागला. खडकावर उभं राहून त्यानं इकडं तिकडं पाहिलं आणि हाळी दिली,

'कोन त्ये...'

आवाज बंद झाला जबाब आला,

'मी हाय वंचा......'

'कोन वंचा?'

लाडक्या वाळवंट ओलांडून पुढं झाला. वंचाला येऊन भिडला.

'मी हाय् सामा जाधवाची वंचा...'

'कोन? जाधवाची वंचा? येकलीच हायस म्हनू की...वरी धावलीस...'

असं म्हणून लाडक्यानं तिच्या कमरेला मिठी घातली. जाधवाच्या वंचानंहि लाडक्याला ओळखलं पण फार उशीरा. 'मावजी, काय ह्ये, काय ह्ये...' ती ओरडूं लागली. लाडक्या थेट पाण्यात शिरला. त्यानं एक हात तिच्या तोंडावर ठेवून तिला कमरेत हात घालून उचललं.

मोळ्याच्या ओढ्यावर लाडक्याच्या बायकोचं माहेर होतं. लाडक्या येता जाता कधीतरी तिथं पाय टेकी. बरेच दिवसांपासून त्याचा आपल्या मेव्हणीवर डोळा होता. त्याच्या मनात तिचं उफाड्याचं शरीर एकदम भरलं होतं. केव्हातरी तो 'चान्स' बघत होता. तो त्याला आज मिळाला होता.

लाडक्याच्या बायकोला पुढं दोन दिवसांनीं ही गोष्ट कळली. लाडक्याला ती नाही नाही ते बोलली. रडारड करून तिनं घरदार डोक्यावर घेतलं. 'कुठं फेडाल हे पाप?' इथपासून 'पटकी आली असल्या दादल्याला...?' इथपर्यंत तिनं लाडक्याला शिव्याशाप मोजले. पदर फाडून देण्याची भाषाहि तिनं एक दोन वेळा बोलून दाखवली. खुद्द सामा जाधव तर इंगळासारखा लाल झाला. पण सुपाच्या घागरावरला उंदीर मारायचा कसा?--

आम्ही लाडक्याला विचारलं.

'काय हे लाडक्या? का केलंस पोराचं वाटोळं?'

लाडक्या त्यावर वैतागानं म्हणाला.

'काय करूं बा! त्या दिशी भलताच पेटलो हुतो मी.

लाडक्या असा दिवसं दिवस वाहात चालला होता. आज जाधवाची वंचा, उद्या धायगुड्याची सखू तर परवा चांगुल्याची अंजी कुणाला ओढ्यात धर तर कुणाला ध्यान ठेवून बाजार वाटेवर आडव, असे प्रकार गुपचुप सुरू झाले. सारा गांव तो









नासवूं लागला. आणि ह्या बायकापोरींना तो आधी कुठंतरी गांठून त्यांची कांहींतरी चीज वस्तू तो ओलीस म्हणून ठेऊन घ्यायचा. सखुची पुतळ्याची माळ तर अंजीचं जोडवं तो आधीं काढून घेई. पोरीबाळी त्या भीतीनं त्याच्याकडं जात. तोहि इमान राखून व्यवहार झाल्यावर ज्याचें त्याचे जिन्नस परत करी.....

नाहीं म्हणायला लाडक्याला एक दुःख होतं. एक खलखल होती. लाडक्याचं लग्न होऊन आज दहा आणि वर आठ वर्षं झालीं होतीं पण लाडक्याला अद्याप पुत्रप्राप्ति नव्हती. दोन–चार झाल्या त्या पोरीच झाल्या. आणि त्याहि होत्या कीं नव्हत्या अशा नाटकांतल्या पात्रासारख्या भराभर काळाच्या पडद्या आड निघून गेल्या लाडक्याला त्याचं फार वाईट वाटे. ती एकच गोष्ट त्याच्या मनाला लागून राहिली होती. राजा दशरथासारखं असलेलं हें दुःख लाडक्या वारंवार आम्हांला बोलून दाखवी. त्याच्या मतानं त्याची बायको या गोष्टीस जबाबदार होती. खाण चांगली लाभली नाहीं असं त्याचं प्रामाणिक मत होतं.

'ढहाळ फुलतीया बरी, पन् ऐन् टायमाला काय हुतं बगा.... पोरीचा जिता वाखा माज्या पदरांत घालती.... '

आतां त्या माऊलीचा काय दोष ! पण लाडक्याची ही भाषा होती. त्याच्या या भाषेचं मला थोडं भयच वाटायचं लाडक्याची बायको या गोष्टीला त्यालाच जबाबदार धरीत होती––

'भायेर असा धानपना करावा मजी पोरं हुत्याल आन् जगत्याल ! '

असा तिचा दावा होता. आम्हांला तो पटताहि होता. तिचं बोलणं सरळच होतं. बाहेरच्या आया बहिणींवर लाडक्या वाघरासारखा तुटून पडायचा. कुणाकुणाला भरल्या आयुष्यांतून त्यानं उठवलं होतं. तर त्याला गृहसौख्य कसं मिळणार ? देवाजीकडून त्याला हा शाप मिळाला होता. असं त्याची बायको म्हणे.

दिवस जातां जातां श्रावण संपला, भादवा लागला. गणेशोत्सव आला. सरत्या पावसाळ्याच्या शेवटीं घरोघर गणपती बसले. लाडक्याच्या गांवीहि कैकांनीं गणपतीची प्रतिष्ठापना केली. गांवच्या पाटलाचा गणपती खास ऑर्डर देऊन पेणहून घडवून आणला होता. साऱ्या गांवाला त्याची अपुबाई लागून राहिली होती. सकाळ संध्याकाळ पाटलाच्या वाड्यापुढं गणपतीच्या दर्शनासाठीं नुसती बारी लागली होती. सगळ्या गांवांत पाटलाचा गणपती उजवा ठरला होता. आणि अशावेळीं लाडक्याला कुणी तरी नवीन तरकीब सांगितली. लाडक्यानंहि बरहुकूम तें काम केलें......

रात्रीचे दहा वाजले होते. नाथाच्या पारासमोरच्या पटांगणांत आज लोकांची गर्दी लोटली होती. सगळा गांव लोटला होता. रानांतली कामं झाटोपून, भाकर तुकडा खाऊन माणसं बाईबाईनं जागा धरून बसलीं होतीं. नुसता हाणधुक्का उसळला होता. पारावर गॅसच्या दहाबारा बत्त्या भकभकत होत्या. आणि खुद्द पाटलांच्या घरच्या दोन मोठ्या सतरंज्या आणि गालिचे पारावर अंथरले होते. आज पाटील स्वखर्चानं गांवाची करमणूक करणार होते, साताऱ्याहून एक संगीत











अनुक्रमणिका

कलापथक त्यांनीं पैसे देऊन बोलावलं होतं. आणि थोड्याच अवधींत नाचगाण्याचा कार्यक्रम सुरू होणार होता. तरण्याबांड पोरी आपला प्रत्येक भाग वांकडातिकडा करून नाच करणार होत्या. अंगाला आळोखे-पिळोखे देणार होत्या. ओठ वडूवांकड करणार होत्या. जमलेल्या प्रक्षकांत त्याची चर्चा सुरू झाली होती. शहर-गांवाला येणं जाणं असलेल मर्दगडी म्हाताऱ्या माणसांना कांहीं समजावून सांगत होते. बाया माणसांनीं उगाच कालवा माजवला होता. आणि चिट्टी चिट्टी पोरं थोड्या वेळानं चालू होणाऱ्या नाचाचीं प्रात्यक्षिकं ढुंगणं वेडी वांकडी करून करीत होती आणि उगाचच खिदळत होतीं.

एकदांचा कार्यक्रम सुरू झाला. दंगा बंद झाला. डोळ्यांत जीव ओतून लोक दृश्य पाहू लागले कानांत प्राण ओतून स्वर ऐकू लागले. कार्यक्रम भलता रंगला सगळी सभा चित्रासारखी स्तब्ध झाली. प्रत्यकजण त्यांत वाहून गेला होता पुढं चालू असलेल्या कार्यक्रमाखेरीज दुसरा कुठलाच विचार मनांत येत नव्हता. दुसरं कांहींच दिसत नव्हतं. पहांटे दोन-अडीचपर्यंत कुणाला कशाचंच भान उरल नाहीं.

कार्यक्रम संपला. पब्लिक पांगलं. आणि एकाएकीं पाटलांच्या वाड्याकडनं बोंब झाली. हाकाटी चालू झाली. मागं राहिलेल शभर एक माणूस पाटलाच्या वाड्यावर धांवून गेलं पाटील आपल्या दोन दोन शेर वजनाच्या गोंडेदार वहाणा घालून सोप्यावर येरझारा घालत होते. त्यांच्या कपाळावरची शीर तट्ट फुगली होती. त्यांच्या अंगाचा नुसता अंगार झाला होता. दांत पाडलेल्या नागागत ते खवळले होते. समोर कांहीं चेहेरे गंभीर होऊन बसले होते, एखादं माणूस गेल्यासारखी परिस्थिति गंभीर झाली होती.

पाटलाच्या वाड्यांतली गणपतीची सुमूर्त चोरीला गेली होती. गांवांतल्याच कुणीतरी हलकट माणसानं तें काम केलं होतं. आणि हें आक्रित करून त्यानं साऱ्या गांवाचा अपमान केला होता. देव्हाऱ्यांतला देव पळविणं म्हणजे काय ? आणि तेंहि पाटलाच्या घरच्या ?

--कोंबड्यानं बांग दिली तेव्हां लोक वाड्यावरनं निघाले. आश्चर्य व्यक्त करीत घरोघर परतले. माणसाचा तलास लावण्यासाठीं रामोशी महारांना हुकूम निघाले आणि तेहि कामगिरीवर निघाले.

दिवस वर आला. लोक आपापल्या कामाला रानात निघून गेले. कुणाला ऊसाला पाणी पाजायचं होतं म्हणून मोट धरायची होती. कुणाची भुईमुगाची खणती चालू झाली होती, तर कुणाची आणखी कांहीं कामं. सतरा व्यवसाय. खेड्यांतला माणूस कधीं रिकामा नसतो. आणि अशा वेळीं लाडक्या परटाची लक्षुमी पाटलाच्या वाड्यांत धाय मोकलून रडत होती. पाटलाच्या पायां पडत होती;

"एक डाव मापी करा वो ! पुन्ना आसं न्हाई होणार, गरीबाचं माप पदराखालीं घ्या; एवढा लिहाज करा..." असं म्हणून रडत होती.

रात्रीं सगळा गांव कार्यक्रमांत गुंगलेला पाहून लाडक्यानं पाटलाच्या घरचा गणपती पळविला होता. तो चांगला होता म्हणून नव्हे तर लाडक्याला पोरगा होत नव्हता म्हणून. दुसऱ्याचा गणपती पळवावा आणि पोरगं झाल्यावर तो दहा दिवसानीं वाजत गाजत मालकाच्या घरीं पोंचता करावा म्हणजे पोरगा होतो. असं त्याला कुणीतरी सांगितलं होतं. आणि या गाढवानं गणपती जितका चांगला तितका होणारा पोरगा नामांकित असा विचार करून खुद्द पाटलाचाच गणपती पळवला होता. घरीं जाऊन त्यानं तो बायकोला दाखवला होता. आपल्याला आतां ख्यातनाम पोरगाच होणार असं तो आपल्या छपरी मिशांवर ताव मारून सांगत होता. आणि मग पुढचीं चित्र पाहात पाहात तो झोपत हरवला होता.

लक्ष्मीला मात्र झोंप लागली नव्हती. आपल्या नवऱ्यानं आणखी कांहीं विलामत आणली असेल पाहिजे; असं वाटून ती तळमळत होती तोंडाला तोंड दिसू लागल्यावर उठून गणपती घेऊन ती पाटलाकडे गेली पाटलाची क्षमा मागू लागली. लाडक्या त्यांना माणूस नाहीं. त्याला कुणी तरी पढवला म्हणून त्यानं हें केलं. अजाणपणीं केलं. माझ्याकडे पाहून अपराध पोटांत घालावा, असं ती पाटलाला मांगू लागली.

पाटीलहि भडकले होते. 'ही परटं माजलींत. ह्यास्नी काढण्या अडकीवल्याबिगर न्हानार न्हाईत.' असं ते वारंवार म्हणत होते. लाडक्या मान खालीं घालून पाटलासमोर उभा होता. प्रकरण थराला चाललं होतं.

मग कांहीं अनुभवी म्हाताऱ्या गांवकऱ्यांनीं पाटलाची समजत काढली. परीट लांडी लबाडी करणारा माणूस नाहीं. त्यानं हें केवळ पोटच्या गोळ्यासाठीं केलं असं पुन: पुन्हां सांगितलं. मग पाटीलहि जरा खालीं आले. समझोता झाला. पण त्यांनी परटाला कांहीं तरी शिक्षा दिलीच. ते ओरडले,

'परटा, गाढवा, अशीं पोरं हुन्यात व्हय ? अरं, आभाळाचं फळ मिळवाय पुन्य करावं लागतं. जा, चालता हू, समद्या गांवाची कापडं आज धून काढ. लेका, अ‍ाज माजा गणपती पळीवलास उंद्याच्याला पोर होत न्हाई म्हणून बाईल पळीवशील माजी ..'

लाडक्यानं ही गोष्ट मात्र आनंदानं केली असती हें पाटलांना काय माहित ? त्यांनीं शिक्षा फर्मावून त्याला हांकलून लावला. लाडक्या निघून गेला. त्या दिवशीं त्याला साऱ्या गांवचे कपडे धुवावे लागले. ज्या बायकापोरींवर त्यानं हात टाकला होता त्यांनीहि आपलीं लुगडीं त्यांत आणून टाकली. गणपती पळविल्यावर पोरगं होत नाहीं तर असं गर्भगळीत होऊन गांवचं धुण मात्र अक्षरशः बडवावं लागतं, हें लाडक्याला समजून चुकलं. कंबरडं मोडेपर्यंत तो त्या दिवशीं कपडे बडवत राहिला.

पुढं लाडक्याच्या बायकोला दिवस गेले. ती पोटुशी राहिली. एक दिवस आम्ही लाडक्याला विचारलं,

'काय लाडक्या, यंदा काय ? पेढे, कीं बर्फी ?'

'लाडक्याचा चावरटपणा संपला नव्हता. तो आम्हांला म्हणाला, आ—लेकानूं म्हंजे ह्ये बरं हाय्...

असं म्हणून तो खळखळून हंसला.

पुढं लाडक्याला मुलगा झाला. तो गजाननाच्याच कृपेनं झाला अशी त्याची श्रद्धा असल्यानं त्यानं पोराचं नांव गणपा ठेवलं. लाडक्यानं पितरांचं ऋण फेडलं होतं.

• • •






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





# सौतीचा गोंधळ

*गेल्या महिन्यांत दीपावलीचें टपाल चाळींत असतांना या लेखाच्या शीर्षकानें आमचें लक्ष वेधलें. लेख वाचून पाहिला आणि आम्हीं थक्क झालों. यांत महाभारतांतील प्रत्येक व्यक्तित्वाबद्दल व्यापक दृष्टिकोनानें आणि पूर्वग्रह बाजूला ठेवून जी चिकित्सा केलेली दिसली ती वाचतां वाचतां लेखकाच्या परिशीलनाबद्दल आदर वाटला. श्री. आत्माराम नीलकंठ यांनीं लिहिलेली ही लेखमाला वाचकांपुढें ठेवण्यांत आम्हांला आनंद होत आहे. यांत कांहीं वाचक लेखकाशीं सहमत होऊं शकणारहि नाहींत; परंतु अशा वाचकांनी यावर आपलें मत कळविल्यास त्याला प्रसिद्धि मिळेल... ..*



कुलीन स्त्रीची अब्रू हा समाजाच्या अथवा व्यक्तीच्या पौरुषाचा मानदंड आहे. शिशुपाल रुक्मिणीच्या अब्रूचा उद्धार करण्यासाठीं उठला तेव्हां त्याच्या मुखांतून ते अपमानाचे शब्द निघावयाच्या आतच कृष्णानें त्याचा वध केला. उलट द्रौपदीच्या अब्रूचे नाना प्रकारचे धिंडवडे धर्मानें शांतपणें सहन केले.

**महाभारताचा आस्तिक दृष्टीनें विधायक विचारसुद्धां डोळसपणेंच व्हावयास हवा.**

## “जयो नामेतिहासोयम्”

**महाभारत हा जय नांवाचा इतिहास आहे असें व्यास म्हणतात. व्यासांची भूमिका मर्यादित होती. सौतीनें या जयाचें महाभारत बनविलें तेव्हां त्यांत अनेक भाकडांची भर घालून, त्याच्याच शब्दांत, या ग्रंथाचें स्वरुप 'यांत जें नाहीं तें कुठेंहि नाहीं' अशा प्रकारचें केलें आहे.**

महाभारत पूर्वकालीन ज्ञानाचा सर्वसंग्रह या दृष्टीनें सौतीचा हा प्रयत्न कितीहि इष्ट असला तरी व्यासांचा मूळ इतिहास त्यामुळें लुप्त होऊन त्याचा अजबखाना झाला हें खास. एखाद्या संग्रहालयांत लक्षावधी वस्तू ना तंत्र ना ताळ अशा स्वरूपांत सांचविलेल्या असाव्यात तसें महाभारताचें हें संग्रहालय झालेलें आहे. हें सर्व फिरून बाहेर पडलेला माणूस शेवटीं संपूर्ण गोंधळलेला असतो. त्याला मार्ग दिसणें दुष्कर होतें. या दृष्टीनें सौतीनें व्यासांच्या मूळ जय ग्रंथास अन्यायच केला असें म्हणावयास हवें.

भारत वाचून होणाऱ्या गोंधळाचें मुख्य कारण म्हणजे कृष्ण आणि धर्म यांचीं चरित्रें होत. शिशुपाल रुक्मिणीच्या अब्रूचा उद्धार करण्यासाठीं उठला तेव्हां त्याच्या मुखांतून ते अपमानाचे शब्द निघावयाच्या आंतच कृष्णानें त्याचा वध केला. द्रौपदीच्या अब्रूचे नानाप्रकारचे धिंडवडे धर्मानें शांतपणें सहन केले. कृष्ण आणि धर्म यांचे असे परस्पर-

विरुद्ध आदर्श महाभारतांत आहेत. या दोन्ही जीवननिष्ठा प्रतिपाद्य विषय अशा स्वरुपांत महाभारतात दिसतात. त्यामुळें शेवटीं यांत प्रतिपादन कशाचें आहे याचा निर्णय घेणें कठीण होतें.

भारत हा खरोखर व्यवहारवेद असेल तर त्याचे निष्कर्ष पुढील पिढीला व्यवहारात उपयोगी पडतील असे हवे. कृष्ण हा हा प्रतिपाद्य विषय असा बुद्धीचा ठाम निर्णय झाल्याशिवाय भारताचा नीट निष्कर्ष कळणें शक्य नाहीं. आणि कृष्ण हाच भारताचा आदर्श असा निर्णय झाल्यावर कृष्ण विरोधी असा युधिष्ठिर, हा आदर्श विरोधी अर्थात त्याज्य असा स्पष्ट समज आपण धरावयास हवा.

विधायक दृष्टीनें विचार करतांनाहि हें मान्य केल्याशिवाय बुद्धीचा गोंधळ संपून नीट प्रकाश दिसणार नाहीं. जी गीता अर्जुनास कर्म–प्रवृत्त करण्यासाठीं सांगण्यात आली तिच्यांतून आम्हास संन्यासपर अर्थ प्रतीत होता त्याचें कारण सौतीनें जयग्रंथाचा केलला गोंधळ हेंच होय. इतिहास काय असेल अथवा कृष्ण काय म्हणाला असेल याचा विचार न करतां जें जें सापडलें तें तें सौतीनें इथें जमविलें आहे. त्यामुळें व्यास जें हवें तें इथें मिळूं शकलें तरी इथें नक्की काय मिळतें तें सांगतां येत नाहीं.

सौतीच्या या कृतीचे दुष्परिणाम आपण निश्चितपणें भोगत आहोंत. आदर्श म्हणून आपणासमोर हा ग्रंथ हजारों वर्षे असतां आपण त्यापासून कांहीहि बोध घेतलेला नाहीं. आपणास या ग्रंथापासून प्रकाश दिसता तर आपलं वैयक्तिक आणि सामाजिक जीवन पौरुषशून्य झालें नसतें. कुलीन स्त्रीची अब्रू हा समाजाच्या अथवा व्यक्तीच्या पौरुषाचा मानदंड आहे. ज्या व्यक्तीकडून अथवा समाजाकडून या अब्रूचें रक्षण होत नसेल त्याला जगावयाचा अधिकार नाहीं. आपला हा मानदंड शून्य पातळीवर येऊन पोहोचला आहे. आपल्या मातांची जी कांहीं अब्रू अजून शिल्लक आहे ती दहशत बसवूं शकणाऱ्या अशा कृष्णासारख्या आपल्या तेजानें नव्हे तर केवळ दुर्योधनास आपल्या कुचाळक्या काढावयास इच्छा अथवा वेळ नव्हता म्हणूनच असें प्रसंगोपात दिसून येतें. दुर्योधनास इच्छा होईल तेव्हां तो आपली अवश्य कुरापत काढतो; आणि त्यावेळीं आपण नाना वेदांत सांगून आपली पौरुषहीनता लपवितो व त्यास दंड करावयाचें टाळतो हें आपणांस मोठें लांछन आहे. महाभारताचा व्यवहारवेद पुढें असूनहि, लाथेनें ठोकरावें केव्हां आणि कपाळावर घ्यावें केव्हां हा व्यवहार आपण शिकलों नाहीं. युधिष्ठिराचें चरित्र हें सर्वथैव अव्यवहारी आणि त्याज्य असें जोंवर आपण छातीठोकपणें सांगत नाहीं, युधिष्ठिराची प्रत्येक कृती ही योग्यच असे सिद्ध करण्यासाठीं वाटेल तो आटापिटा करावयास जोंवर आपण तयार आहोत तोंवर आपणास महाभारताचा कांहींच उपयोग होणार नाहीं. कृष्णास नेहमी हृदयाशी धरावें आणि युधिष्ठिरास चार हात दूर ठेवावें हें आपण स्पष्टपणें जाणावयास हवें तरच व्यासाचे श्रम कारणीं लागणार. नाहीतर आपण गंधफुलें घालून वेदाची पूजा करावी आणि म्लेंच्छांनी वेदाचा अर्थ लावावा ही जशी आपली अधोगती आपण पहातो त्याचप्रमाणें आपण भारत हा आपला व्यवहारवेद मानावा व त्याचे आदेश आपणास इतरांना व्यवहारात आणून दाखवावे असाहि प्रसंग आलेला आपणास दिसेल.

## आत्माराम नीलकंठ

कुलीन स्त्रीच्या निरीस हात घातला गेल्यावर त्याचा पौरुषाने प्रतिकार झालाच पाहिजे मग त्यासाठी राष्ट्राराष्ट्रात प्राणांतरण घडून सर्व नाश झाला तरी परवडला. स्त्रीचा अब्रू सुरक्षित नसेल तर तें राष्ट्र जगून तरी काय फायदा हें आपणांस उमगत नाहीं. अगतिकता, पौरुषहीनता, लाचार आत्मप्रौढी, ढोंगी तत्त्वज्ञान हीं आपल्या जीवनाची अंगे झालेलीं आहेत; त्याचें कारण आपण गीतें-आणि भारतातून काढीत असलेलीं विपरीत तात्पर्येंच होत. याची जबाबदारी जेवढी सौतीवर आहे. तेवढीच आपणावरहि आहे. आपणांस डोळे उघडून बघण्याचें सामर्थ्य नाहीं. आपणास कांहीं शिकण्याचें सामर्थ्य नाहीं. सत्य समोर नागवें उभे राहिल्यावर आपणास त्याकडे पहाण्याचा धीर नाहीं. आपण आपल्या मनाचे आरोप त्या सत्यावर नेसवून तें सत्य पहाणार आणि मग डोळ्यात धूळफेक झाली म्हणजे रडत बसणार.

पदोपदीं या गोष्टी घडत आहेत पण आपण सावध होत नाहीं. कोणत्याहि गोष्टीला मर्यादा असतात, दोन बाजू असतात, हें विसरून आपण "वयं पंचाधिकं शतम्" असल्या अर्थशून्यांना शाश्वत सत्यें म्हणून उराशी बाळगीत आहोत. कृष्णाचा सत्कार करणें असेल तर युधिष्ठिराचा धिक्कार करणें आवश्यक आहे हें आपण जाणत नाहीं. युधिष्ठिरानें जी जी कृती स्वतः केली ती ती त्याला गोत्यांत आणणारी झाली; कृष्ण जेव्हां जेव्हां त्याच्या सहाय्यास आला तेव्हां तेव्हांच त्याचें रक्षण झालें हा स्पष्ट प्रकाश समोर असता आपण त्यातून कांहीं पाहूं शकत नाहीं. हें आपलें दुर्दैव होय.

• युधिष्ठिराचा धिक्कार केल्याने आपण नरकात पडणार नाहीं असा आपला ठाम विश्वास हवा. एक युधिष्ठिर तरी नरकात जाईल अथवा कृष्ण तरी नरकात जाईल. कृष्ण नरकात जाणार नाहीं. आणि गेला तरी तो नरकाचा स्वर्ग बनवील ही गोष्ट निश्चित आहे. उलट युधिष्ठिर हा अपशकुनी आहे. तो राज्य उधळून भिकेस लावील; पातिव्रत्याची दासी कराल, जयाचा अपजय कराल. त्याचा पिंड अपशकुनी आणि दुःखें प्रसवणारा आहे. तो स्वर्गात गेला तरी क्षणात स्वर्गाचा नरक करील.

या लोकी व्यवस्थित जगून परलोकाचे साधन करणें शक्य आहे हेंच कृष्णाचे चरित्र. हाच व्यवहार आपण भारतावरून शिकावयाचा. हा आपणास भारताने शिकविला तरच तो व्यवहारवेद.

हा विषय प्रचंड आहे. तो इथें आवरतां येणार नाहीं. पुढें जें विवेचन येणार आहे त्या मागील दृष्टीचा परिचय व्हावा म्हणून हें प्रास्ताविक आहे. या विवेचनात कुणाचीहि वकिली केली जाणार नाहीं. कुणाचाहि आकसाने धिक्कार केला जाणार नाहीं. विवेचनाची दृष्टी संपूर्ण पक्षपात रहित अशी राहील. कौरव विवेचकाचे मित्र नाहीत. पांडव विवेचकाचे शत्रु नाहीत. कृष्ण द्रौपदी हीं विवेचकाची दैवतें आहेत. विवेचकाचा भारताचा अभ्यास विधायक पण शुद्ध अशा दृष्टीनें झालेला आहे. विवेचनांतील विधानांना बहुतेक ठिकाणी मुळात आधार आहे तर क्वचित ठिकाणी सुसंगत तर्काचा आधार आहे. श्रद्धाळू लोकांस मुद्दाम डिवचावें अशा खट्याळपणानें हा उद्योग आरंभिलेला नाहीं; तर तळमळीनें आरंभिला आहे. 'यतो कृष्णस्ततो जयः' हें श्रद्धाळू लोकांचे श्रद्धास्थान विवेचकाचेंहि श्रद्धास्थान आहे. 'तूं नेमून दिलेलें काम कर' अशा भगवंताच्या आदेशानेंच हा उद्योग चालू केला आहे. 'तुला सर्व पापांतून मी बाचवीनच' असें भगवंताचेंच मला आश्वासन आहे. • • • •






जलद वहातूक सव्र्हीस निश्चितपणें ठराविक वेळेतच मालाची पोहच करते

# मध्य रेल्वेने कांहीं महत्त्वाचे माल वहातुकीचे मार्ग खालील नमूद केल्याप्रमाणें सुरू केले आहेत:

| | वाहेतुकीचा वेळ | |
|---|---|---|
| वाडीबंदर ते बंगलोर सिटी | ५ | दिवस |
| ,, ,, शालीमार | ८ | ,, |
| ,, ,, नागपूर | ३ | ,, |
| ,, ,, सॉल्ट कोटौर्स | ८ | ,, |
| ,, ,, अडोणी | ५ | ,, |
| ,, ,, येरागुंटल | ६ | ,, |
| ,, ,, कोल्हापूर | ३ | ,, |
| ,, ,, कानपूर | ६ | ,, |
| ,, ,, विजयवाडा | ६ | ,, |
| ,, ,, सिकंदराबाद | ३ | ,, |
| ,, ,, हैदराबाद | ४ | ,, |
| ,, ,, अकोला | २ | ,, |
| ,, ,, अमरावती | ३ | ,, |
| ,, ,, जबलपूर | ४ | ,, |
| ,, ,, भोपाळ | ४ | ,, |
| ,, ,, ग्वाल्हेर | ५ | ,, |
| ,, ,, लखनौ | ७ | ,, |

| | वहातुकीचा वेळ | |
|---|---|---|
| ,, ,, अलाहाबाद | ७ | दिवस |
| ,, ,, वाराणसी | ८ | ,, |
| ,, ,, पाटणा | ९ | ,, |
| ,, ,, हौरा | १२ | ,, |
| ,, ,, मुझफरपूर | १२ | ,, |
| ,, ,, दुर्ग | ५ | ,, |
| पुणा ते नवी दिल्ली | ६ | ,, |
| ,, ,, शालीमार | ७ | ,, |
| सोलापूर ते सॉल्ट कोटौर्स | ६ | ,, |
| लासलगांव ते नवी दिल्ली | ६ | ,, |
| ,, ,, शालीमार | ८ | ,, |
| नागपूर ,, नवी दिल्ली | ६ | ,, |
| ,, ,, सॉल्ट कोटौर्स | ८ | ,, |
| ,, ,, वाडी बंदर | ४ | ,, |
| सिकंदराबाद ,, बंगलोर सिटी | ६ | ,, |
| धोलपूर ,, वाडी बंदर | ६ | ,, |

—+ रेल्वेमार्गानेच मालवहातूक जलद आणि सुरक्षितपणें होते. +—

अधिक माहितीसाठीं वाडीबंदर येथील गुड्स सुपरिन्टेण्डेण्ट यांना कृपया भेटा.

## ☆ म ध्य रे ल्वे ☆

# पेटते पहाड

— प्रॉ. नलिनी मुखठणकर

मी सध्या रहातों आहे त्या हाऊसबोटीचें नांव आहे 'स्वप्नतरंग!' दलसरोवराच्या निळ्या-हिरव्या गहिऱ्या नी नाजूक नाचऱ्या लहरींवर, हालणारी झुलणारी, डोलणारी हिंदोळणारी ही गृहनौका, खरोखरच एक 'स्वप्नतरंग' आहे! हिरव्यावाट हिरवळीवर, मोहिनीच्या मुरळीनं भारावून धुंदावून पडलेल्या नागाच्या फण्याप्रमाणें डुलणारी झेपावणारी दलसरोवराची लाट, आणि त्या फण्यांत बसविलेला कौस्तुभमणि म्हणजे ही 'स्वप्नतरंग' नांवाची नाव...पाण्याच्या नीलकंठी घनतेशीं स्पर्धा करणारा पांढराशुभ्र रंग, जणूं सारवलेल्या मातीवरची रांगोळीची रेघ, पायऱ्यांचा तरंगता झुला, विलायती फुलांच्या कुंड्यांची रंगीबेरंगी आरास, वरील गच्चीवरील रंगीत भल्यामोठ्या छत्रीखालील वेताच्या खुर्च्यांच्या मांडणावळीची शान...बाहेरून देखावा तर अगदीं रमणीय मुलायम, काश्मीरच्या निसर्गसौंदर्याशीं मिळताजुळता! जणुं लाटेच्या कडेवरच्या फेसाचा फसफसून फुटणारा बुडबुडा म्हणजे, ही स्वर्लोकीची स्वर्गीय नैय्या, खरी असूनहि खोटेपणाचा आभास निर्माण करणारी ही कल्पनाशक्तीच्या स्वप्नील जगांतील 'स्वप्नतरंग नौका!'

जुलै महिन्यांतील ढगाळलेल्या दुपारची ही साडेअकरांची वेळ! सूर्याचे सौम्य, स्निग्ध आणि चककिरण केवळ बर्फाळ शिखरांना चमकदार, खडीसाखरेप्रमाणे पारदर्शक बनवताहेत आणि त्यांतील









अनुक्रमणिका

निळसर गुलाबी छटांचें मिश्रण, उषःकालालाहि लाजविल असें चेतोहारी आहे! मला दुसरा उद्योग नाहीं, लंचलाहि अजून बराच वेळ आहे! तेव्हा गोल्डनईगलची बाटली खोलून त्यातील गढूळ बीअर पीत 'लागर'ची आठवण करत बसण्याशिवाय मी काय करणार? गरम झालेल्या बेचव बीअरचे घुटके घेत मी सोफ्यावर रेंगाळतो आहे! काश्मिरी किमती गालिचा, कुठल्याशा टॅब्रीज का मर्हुरथ डिझाईनचा जुना झालेला असला व मधून मधून रेशमी झुपके झडून गेलेले असले तरी, पायाखाली पसरलेला आहे, स्लिपर मधून बाहेर पडलेल्या नागव्या पावलांना, गुदगुल्या करणारा गुलगुलीत मृदुमखमली स्पर्श करून सुखावतो आहे, 'सुस्तावलेल्या जडावलेल्या आर्धोन्मिलित पापण्यांमधून काश्मिरचें सृष्टिसौंदर्य आंत प्रवेश करून डोकावून पहात आहे,. जसा जलाशयाच्या आरशांत आकाशाचा मुखडा आपलें मनोरम रूप अवलोकितो तसा!...हें शराबी गुलाबी सौंदर्य पिऊनच केवळ डोळे आरक्त व्हावेत, सुखाची नशा चढावी! पण मी कंटाळलो आहे, पार विटून गेलो आहे! ती पहा सालिमा परत जेवणाच्या खोलींतून डोकावून गेली. डोळे न उघडताच, तिच्या अंगाच्या दुर्गंधीमुळें तिच्या अस्तित्वाची जाणीव घ्राणेंद्रियाला झाली...

हे काश्मिर! तुझें निसर्गसौंदर्य म्हणजे लेखककवींची मालमत्ता आहे! जें लिहिलें गेलें तें काही खरें, काही खोटें, बरेचसे भडक रंगांनी माखलेलें, अगदी काश्मिरी फुलांसारखें अगर फळांसारखे नकली... काश्मिरी फुलांना सुवास नाही, फळांना चव नाही, वारें दिखाऊ! इथे म्हणे पूर्वी पहाडाच्या भिंतींनीं बनवलेला जलाशयाचा प्याला होता, तो काश्यप ऋषींनीं रीता केला! काश्यप ऋषि व नीर ह्या शब्दाचा अपभ्रंश होउन काश्मिर हें नाव तयार झालें म्हणे! असेल, तसेंहि असेल! काश्यपऋषींनीं रीतें केलें असेल तें पाणी नव्हे, खुद्द जीवनरस त्यांनी शोषून घेतला आहे काश्मिरातून बाकी राहिलें आहे तें केवळ सृष्टिसौंदर्य, सहानुभूतिशून्य, निर्दय, निघृण निसर्ग! काश्मिरचा महादेव बर्फाचा आहे, थंडगार भावनाशून्य हृदय घेऊन अमरनाथाच्या पहाडावर झोपा काढतो आहे! आणि त्याच्या पदतला वास करणाऱ्या मानवाचें दिल् आहे अल्लाच्या स्वाधीन, ना पोट आहे हिंदवासियांवर अवलंबून! भावना आहेत पाकिस्तानी, पण भाकरीचा तुकडा आहे हिंदुस्तानी! असा आहे हा उलटा न्याय! किती एक सलिमा हाऊसबोटीच्या बाहेरच्या कठड्यावरून, माझ्यासारख्या–परदेशीयाच्या भोंवती घिरट्या घालतच आहेत...दारिद्र्यानं, लाचार होऊन, अगतिक बनून, कोडग्या निर्लज्ज बनून!

काश्मिरच्या सृष्टिसौंदर्याची मादक असर–ज्या भुलभुलावणीला कशाचीच सर नाही, ती काय मी जाणत नाही? काश्मिर म्हणजे डोळ्यांना आल्हाद देणाऱ्या, एप्रील महिन्यातील शिरव्याच्या गारव्याचा शिडकाव करणाऱ्या हिरव्या रंगाच्या, अनेक छटांचा मिलाप! पहाडाच्या उतरणीवरच्या आणि दरींतल्या शेतांची, मुलाच्या नाजूक करंगळाशीं चढाओढ करणारी कोवळी कोमल पोपटी पातीं, बर्चनागाचिनार वृक्षाचा गडदपणा, सुरूची आकाशाला भिडणारी तीक्ष्ण गडद करडी टोकें, उत्तुंग पहाडाचा काळसर हिरवेपणा, त्यातच बर्फ ढगे आणि धुक्यामुळें मधूनमधून बदललेला बादली धूपछॉंव रंग आणि पाण्याचा निळसर हिरवेपणा! जणुं पोपटाचा पोपटीपणा, मयूरपंखाच्या पिसाऱ्याचा मोरपिशी रंग, पाचूचा हिरवा गडदपणा आणि विषाचा हिरवट धूसरपणा, ह्या साऱ्यांचें मिश्रण करून काश्मिरला फासलेलें आहे! फुलाफळांच्या भडक रंगांनीं ह्या एकच एक हिरवेपणाला कुठें कुठें आग लावण्यासारखी वाटतें! माझ्या गृहनौकेचें नांव 'स्वप्नतरंग' पलिकडच्या गृहनौकेचें नाव 'स्वप्नसृष्टि' (Dream land) ही पहाडाच्या संगमरवरी धवल शिखरांना जाऊन भिडलेली माझ्या देखत खुलणारी स्वप्नसृष्टि खरी असूनहि खरी नाहीं, मृगजळाप्रमाणं फसवी आहे...

काश्मिरचा निसर्ग एखाद्या निर्घृण, क्रूर, निर्दय, हृदयहीन, सहानुभूतिशून्य धनवानाप्रमाणें आपले विपुल वैभव मिरवतो आहे! ह्या अप्सरांच्या राज्यांच्या पोटांत, केवढा मोठा जीवनसंग्राम दडला आहे, पण डोळ्यांत भरते तें काश्मिरचें सृष्टिसौंदर्य! उतू गेलेल्या दुधाप्रमाणें वांया गेलेलें सृष्टिसौंदर्य! नाहींतर माझ्या महाराष्ट्राचा दगड न् दगड, गिरीकपारी, मातीचा हरएक कण, महाराष्ट्रीयाच्या व्यक्तिमत्वाची, गुणावगुणाची, सुखदुःखाची, अडिअडचणींची साक्ष पटवतो. आणि इथें निसर्ग आपल्या समृद्धीची मिरास उन्मत्तपणें मिरवतो आहे. माणसाच्या छातीवर पाय रोवून आपल्या धनदौलतींतूनच मनाचें दारिद्र्य प्रगट करतो आहे! काश्मिरचें सृष्टिसौंदर्य निरखलें पण काश्मिरी माणसाचें पेटलेलें जीवन कुणी अवलोकिलें काय?...

सलिमा हाऊसबोटीच्या बाहेरच्या कठड्यावरून पुन्हा पुन्हा उगीचच जा ये करते आहे! लाकडाचीं सरकदारे सरकावून खिडक्यांची उघडझाप, ऊनछायेचा खेळ खेळत आहे! कुणी पहात नाहीसें पाहून तिनें बादलच्या–आपल्या चुलतभावाच्या पाठींत दोन धपाटे घालून त्याला रडवलेंहि! बोटीचा शिकारा घेऊन ती मध्येंच श्रीनगरच्या किनाऱ्याला लागते आहे, परतते आहे! मला 'यायचं का?' म्हणून विचारत आहे! येनकेन प्रकारेण तिला माझें लक्ष वेधून घ्यायचें आहे! तिला माहित नाहीं की तिच्या अंगच्या दुर्गंधानें माझें लक्ष कधीच तिच्याकडे वेधलें गेलें आहे, छिन्नविछिन्न झालें आहे! मळमळल्यामुळें बिअर घुटक्यांतून परतून आठातून पडूं पहात आहे!

मीं ना अनोखी परदेशीं फिरस्ता, ती ना काश्मिरी सुंदरी! कुठं आहेत त्या गाजलेल्या नावाजलेल्या काश्मिरी सुंदरी? ओक्या ओक्या भातशेतात (Paddy-Fields) कुणी पोरीनें गोफण फिरवताना दिसली नाही, बाजारात लगबगीनें माथ्यावरून कडेवरून भारा वाहणारी नाजूक कमर लचकताना दिसली नाहीं. पॉपी हॉलिहॉक्सचा टपोऱ्या फुलाचा बहार तोडणारी रक्तवर्ण सडक बोटें दिसली नाहीत, कीं आपल्या प्रमाणेंच गोजिरवाण्या गोंडस करडाला अवखळपणे उचलण्याकरता वाकलेला कमनिय बांधा दिसला नाही! खिडकीच्या पडद्यामागून डोकावणारा लाजरा आरक्त चन्द्रमा नाही, की गुलमर्गच्या पहाडावरून अगर पहेलगामच्या खळखळणाऱ्या अरूनिर्झरणीच्या काठांवरून बेदरकारपणें टवकारून पहाणारी, भिरभिरणारी, रसरसणाऱ्या जवानीची नजर आढळली नाही! आढळली ती सलिमा, तिची चुलती लतिफा, आणि तिच्यासारख्याच इतर स्त्रिया! लालबुंद चेहऱ्याच्या ऊग्रपणात भर टाकणाऱ्या जाडजूड काळ्याभोऱ्या भुवया, त्याखालील अनैसर्गिक वाटणारे, ढुच्चेपणाची साक्ष पटविणारे, बारीक काळे डोळे, घट्टघट्ट मिटून घेतलल्या पातळ ओठांच्या पाकळ्यांची एकच एक बारीक रेषा, आणि क्रूर वखवख-





लेली, हृदयाचा आरपार छेद घेणारी नजर! कादिमरचें हें मानवी सौंदर्य, कुठेंतरी, कसेंतरी, क्वचित! कां गोपांत दडलेलें आहे, गुलमर्गच्या पायथ्याशीं असलेल्या क्षयी सॅनिटोरियम मध्यें लपलेलें आहे?

सलिमा कां घिरट्या घालत आहे तें मी जाणतो! मीं हाडाचा लेखक नाहीं, माझ्याजवळ कल्पनाशक्ति नसेल, पण मी व्यवहारी आहे, आणि माणूसहि आहे! काश्मिरी गालिचा किंमती असला तरी त्याचा जुनाटपणा, उडालेला रंग, कुठंकुठं निघालेले लोकरीचे पुंजके, धूळ आणि विटकेपणा. माझ्या डोळ्यांना दिसल्याशिवाय रहाणार नाहीं अगर मी त्या दोषांवर पांघरूण घालणार नाहीं! काश्मिरी माणसाचें सौंदर्य ठळकपणें माझ्या नजरेंत भरण्याऐवजीं. डोक्यांत घुसलें खुपलें, आणि त्यानें तिरिमिरी आली. तें त्यांचें दारिद्र्य, गलिच्छपणा, आळशीपणा आणि उग्रता! मग त्यांच्या सौंदर्याच्या खुलावटीचें वर्णन मी कसें करूं शकणार? काश्मिरी सुंदरीशीं झालेला शरीरसंबंध लेखकांच्या मतें स्वानुभव ठरेल! पण माझ्या घ्राणेंद्रियावर इथें इतका अत्याचार झाला आहे कीं, तोच दुर्गंध मला जिथेंतिथें येतो! पाण्यावरची, अन्नावरची माझी वांछा पार उडून गेली आहे! जणुं काय ती घाण चरांचरांत भरून उरली आहे! सांगा, मी तो अनुभव कसा अनुभवूं शकूं? मला केवळ सलिमाच्याच शरिराची शिसारी येणार नाहीं, तर माझ्याही अंगोपांगांनीं तिच्या शरिराचा गलिच्छ दुर्गंध टिपून घेतला आहे, असं जन्मभर वाटत राहील.

सलिमाला काय हवें ते मी जाणतो. तिला थोडा पैसा, मला क्षणिक मौज मिळावी, असा हा व्यवहार आहे! म्हणून ती कोपिस करून राहिली आहे. पण मी तिच्याकडे दुर्लक्ष करतो आहे! मान न वळवतांहि केवळ नाकानेंच मला तिचें आगमन, अस्तित्व जाणवत आहे, तरीहि मी दुर्लक्ष करतो आहे! मी कांहीं मोठा नीतिमान नाहीं! सलिमाची किंमत देण्याइतपत माझ्या खिशांत पैसाहि आहे! मी 'लागर,' अगर 'स्कॉच' पिऊ शकत नसेन, पण 'गोल्डन ईगल' अगर कमौलीच्या ब्युअरीची 'ब्लॅक नाईट' पिण्याइतपत माझी हिंमत आहे, आणि तरीहि अजून मला सलिमाला जवळ करावेसें वाटत नाहीं! आणि सलिमा दारिद्र्यापोटीं, थोड्याशा चैनीला पैसे मिळवण्याखातर आपल्या शरिराचें दान करण्यास जिवाचें रान करतेच आहे!

बदमाष आहे पोरगी! माझ्या गृहनौकेच्या मालकाची, चिअराची ही अनाथ पुतणी! तिच्या चुलतीच्या, लतिफाच्या संमतीनें तिचें कौमार्य कधींच डागळलें-हाताळलें गेलें आहे! 'स्वप्नसृष्टि' सध्यां रिकामी-खाली आहे, आणि तिचा मालक कोत्रू सलिमाला रोज रात्रीं त्या गृहनौकेच्या खोलींत [ निजण्याच्या ], शय्यासोबतीस नेत असतो. कधीं कधीं माझ्या खोलींत केवळ चांदण्याचे दिवेच लागले असतांना व त्याच्या खोलीच्या खिडकीचें सरकदार बरोबर गच्च सरकलेलें नसतानां, माजलेल्या पोळाप्रमाणें दारू पिऊन कोत्रू तिला त्रास देतांना मी माझ्या डोळ्यांनीं पाहिलें आहे. मला त्या साऱ्या प्रकाराच्या दृश्यानें मनस्वी किळस आली आहे, त्याप्रमाणेंच चार दमड्यांकरतां ती सहन करत असलेले हाल पाहून कणव आली आहे! आपल्याहि ह्या पलंगावर आणि गादीवर असें कुणी केलें आहे कीं काय ह्या शंकेनेंच माझ्या अंगावर शहारे येतात आणि जमिनीवर झोपावें अगर पाण्यांत उडी घ्यावी असें वाटूं लागतें!



## तसा फारसा फरक नाहीं

हिंदी सेनेंतील बहादूर ब्रिगेडियर जसवंतसिंह सुटीमधें आपल्या गांवीं गेले. एके दिवशीं गांवाबाहेर फिरायचास गेले असतां त्यांना एका झाडाच्या बुंध्यावर निशाण बाजीच्या उत्कृष्ट खुणा दिसल्या. झाडाच्या बुंध्यावर १०-१२ टिकाणी वर्तुळाच्या बरोबर मध्यावर गोळी बसलेली होती. इतका अद्वितीय निशाणबाज कोण? ब्रिगेडियरना प्रश्न पडला, त्यांनीं गावांत चौकशी करावयास सुरवात केली तेव्हां तें काम एका वेड्यानें अमल्याचें त्याना कळलें. ते अधिकच बुचकळ्यांत पडले व वेड्याच्या मुलाखतीस गेले व इतकं अत्युत्तम शिक्षण कुठं घेतलं म्हणून विचारलं. तेव्हां तो वेडा शांतपणें म्हणाला "ब्रिगेडियरसाहेब अगदीं साधी गोष्ट आहे ही. फक्त डोकं वापरावं लागतं" "तें कसं?" ब्रिगेडियरनी विचारलं.

"त्याचं असं आहे" वेडा म्हणाला "तुम्ही प्रथम झाडाच्या बुंध्यावर वर्तुळ काढता व मग त्यांत गोळी झाडता मी प्रथम गोळी झाडतों व मग वर्तुळ काढतों."

कोत्रूकडून मिळणारे पैसे लतिफाचाचीला द्यावे लागतात म्हणून ही कार्टी तिच्या नकळत माझ्या मागें लागली आहे. बिचाऱ्या चिअराला हें कांहीं माहितहि नसेल! गरज पडेल तेव्हांच तो काम करत असतो. हाऊस बोटींत मारे त्यानें भपका केला आहे, पण त्यानंतर स्वच्छता ठेवण्याचें काडी इतकें ज्ञान नसल्यामुळें उडालेल्या रंगासारखें त्याचें चित्र आहे! आतांच पहाना, बिअर प्यायल्यामुळें मला वारंवार बाथरूमवर जावें लागत आहे, पण तिथल्या कमोदच्या घाणीनें आणि मोरीच्या गलिच्छपणानें मला ओकारी येत आहे! स्वच्छता कशाशीं खातात तें मोठमोठ्या अलीशान हॉटेलांतहि काश्मिरमध्यें कुणाला माहित नाहीं! तरी बरें चादरी, अभ्रे, उशी आपल्या आपणालाच पुरवाव्या लागतात, नाहींतर खुशाल कुणीतरी वापरलेल्या आणून देतात! मनांत आलें तर तोच चिअरा कमोदहि साफ करतो आहे, आणि बशी-प्यालेहि धुतो आहे. तेंच दलसरोवराचें गलिच्छ पाणी वर टांकींत भरलें जातें! पिण्याचं पाणी बाहेरून आणतात म्हणतात! खरं काय तें त्यांचें त्यांना ठाऊक!

तोच चिअरा आपल्या तुंब्यांत निर्धास्तपणें वेळ मिळेल तेव्हा हुक्का पितो आहे! लतिफा धाकट्या पोराला कुशीमध्यें छातीशीं लाऊन सदाचीच हुक्क्याशीं बसलेली असते! हिच्या तोंडांत सदानकदा हुक्क्याची नळी, नी पोराच्या तोंडांत तिचा स्तन! चोळीं







अनुक्रमणिका

संपलें. की तें पोर लोंबकळणाऱ्या छातीचा फुगा अगर खुळखुळा बनवून खेळत रहातें ! ना काम ना धाम...एव्हढें दृष्य पहावें आणि मातृत्वाचा तिटकारा करायला शिकावें; अंगोपांगाचें प्रदर्शन कलात्मक रीतीनें करणाऱ्या वारयोषिता बऱ्या वाटायला लागाव्या ! रिकामपणामळें कदाचित् हे वंडखोर विचार माझ्या मनांत घुमत असतील पण एकदां सलिमानें जें काय केलें तें पाहून...

तें घाकटें पोर, अबदुल्ला असाच रडत होता. आणि लतिफा घोरत पडली होती. माझ्या भोंवती वावरत होती सलिमा ! तिच्या काय मनांत आलें कुणास ठाऊक तिनें सरळ जाऊन त्या पोराला मांडीवर घेतलें, खुशाल भराभर आपल्या झग्याची बटणें सोडली आणि आपला स्तन काढून तो त्या कोकाटणाऱ्या कार्ट्याच्या तोंडांत कोंबला ! मी पहात होतों म्हणूनच तिनें असें केलें होतें ! मी चकीत होऊन तिच्या ह्या आगाऊपणाकडे पहात होतों ! ती दूर असल्यामुळें तिची दुर्गंधी मनाला जाणवत नव्हती, आणि तरीहि नारळाच्या करवंटीप्रमाणें असलेला तिचा धष्टपुष्ट, टणक पांढराशुभ्र उभार स्तन वासना चेतवणारा असला तरी तिच्या निर्लज्जपणामुळें माझ्या मनांतल्या वासना सगळ्या गुदमरून गेल्या ! त्यांत 'स्वप्नसृष्टी'च्या तुंबगांत बसलेल्या कोत्र्याच्या नोकरानें–अलीनें, तिला अवलक्षून जे काय घाणेरडे अश्लील अविर्भाव केले त्यानें मला धक्काच बसला.

मनांतलें कांहींतरीं नाजूक हळुवार खळकन् फुटलें गेलें ! मी घाडकन् सरकदार ओढून घेतलें तरी सलिमेचें कोडगें निर्लज्ज फिदी फिदी हसणें माझ्या कानांत घुमतच होतें !...

चिअरा मध्येंच येऊन विचारतो, "जनाबांसाठीं कांहीं कबाब बनवून आणू कां ?', मी माननेंच नको म्हणतो आणि अक्रोडाकडे बोट दाखवतो. माझा मूळचा पिंड मांसाहारी, पण काश्मिरमधील कुठेंही भर रहदारीच्या रस्त्यात असलेली खाटकाचीं दुकानें पाहून व बाहेर लोंबकळणारी सोसलेली जनावरांची धडें अवलोकून, मांसाहाराबद्दलच काय पण शाकाहाराबद्दल, एकूण अन्नाबद्दल मला शिसारी बसली आहे. नाहींतरी काश्मिरी शाकाहारी जेवणाला चव नाहीं, आणि दही-लोणचें पापड असले तोंडी लावणें खाण्याची ह्यांना माहिती नाहीं. सध्यां मी अक्रोडावर आहे, फलाहारावर, पण काश्मिरी फळांचा मला आतां कंटाळा आला आहे. केळयाची नी आंब्याची चव, पीचला नी पेअरला नाहीं ! तोंडाला चव नाहीं, मळमळ सुटली आहे नी गर्भार स्त्रीप्रमाणें सारखी उलटी येत आहे !

......विचार करत बसावलाहि गृहनौकेंत उसंत नाहीं. खाजगीपणा नाहीं ! पाठीमागील उघड्या खिडकींतून फेरीवाले धडाधड आंत उड्या टाकतात. आपापला माल खपवण्याची त्यांच्यांत एकच चुरस लागते. जळवा लागल्याप्रमाणें आपल्या गृहनौकेला शिकारे लागतात, माशांनीं हल्ला करावा त्याप्रमाणें फेरीवाले तुटून पडतात. साब चुगुक (पिच)' लिजिये...बगुगोशा (पेअर) सेब (मकरचंद) लिजिये...केसर लिजिये...जनाब, स्टोन्स, राजवरख, एमरल्ड, पुखराज...जनाब सिल्व्हर नेकलेस...साडी लिजिये...एकच एक गोंधळ ऐकून आपलें मस्तक फिरून जातें...आपणांस सल्ला मिळाल्याप्रमाणें आपण अर्धा भाव करतों ! मग खरी मनांतली मळमळ बाहेर पडते, हृदयांतला राग व्यक्त होतो. जगाबद्दल, नशिबवानांबद्दल, एकमेकांबद्दल आणि सरकारबद्दल.

"आमच्या मालाची किंमत अर्धा कराल जनाब, पण सरकारी आर्ट एंपोरियममध्यें जाऊन तोच माल वाढत्या किंमतींनं विकत घ्याल !"

"आमचा माल सेंट्रल मार्केटमध्यें सरकारी दुकानांत ठेऊन सच्चा माल म्हणून डबल भाव काढतात, आणि आम्हांला झुठे फसवे ठरवतात..."

"आमचा व्यापार सरकारनं जिथंतिथं दुकानं काढून मारला, आमच्या पोटावर पाय आणला."

"फक्त मोसमांत काय ती थोडीफार विक्री..."

"सरकारी दुकानांतल्या विक्र्याला तुम्ही माल घेतां की नाहीं ही पर्वाहि नसते. गिऱ्हाईकाला खुष करण्यासाठीं, त्यानें काश्मिरची कीर्ती जगांत करावी म्हणून त्याला चांगला माल देण्याची प्रवृत्ति त्यांच्यापाशीं नाहीं ! सरकारचे पगारी नोकर ते ! ते नकली माल भारभार किंमतीला देतात आणि तुम्ही विकत घेतां. आणि असंहि होतें फेरीवाला २५ रुपयांना खड्यांचा सेट सांगतो. मी सात रुपये किंमत करतो. तो कींव भाणण्यासारखें भाषण करून चारदां परतून अखेरीस मला विकत देतो. गरिबाच्या पोटावर पाय आण य बद्दल हुरहुर लागते मनाला. सहज सेंट्रल मार्केट मध्यें कुतूहलानं तशाच सेटची चौकशी करतो. त्याची किंमत ७ रुपयेच असते ! आणि असेंही होतें ...

"हे अलूबुखार, चार आणे रत्तल, हे ऍप्रीकॉट सहा आणे" आपण विकत घेतल्यानंतर, "ह्या अलूबुखारचे मी आठ आणे रत्तल सांगितेल होते साहेब, आणि ऍप्रीकॉटचे बारा आणे ! अल्लाहकी कसम !" अल्ला,अल्ला, अल्ला ! पंच्याण्णव टक्के लोकांच्या जीभेवर अल्लाचें नांव ! आणि, आणि पाकिस्तानच्या गुलमर्गाकडे भिडणाऱ्या रेषासीमेवर हिंदुस्थानचें सैन्य ! काश्मिर आमचें आहे, कारण काश्मिरचा राजा पंडित होता, आणि हिंदुस्थान सरकारनें काश्मिरांत आपल्या तमाम राज्याचा पैसा ओतला आहे ! बनिहालच्या दरींत, झेलमच्या भोवऱ्यांत, व्यापारांत आणि प्रवास करणाऱ्या प्रवाशांच्या उत्तेजनार्थ ! काश्मिरी माणसाचा देह हिंदुस्थान सरकारच्या अन्नावर पोसतो आहे, आणि तरीहि सरकारला शिव्या देण्यास उसळ्या घेतो आहे ! ही नाखुष मनःस्थितीची चूड आणि तिनें पेटवलेले पेटते पहाड...भडकती ज्वाला आणि विरोधी परिस्थितीची झळ......काय होणार, खरेंच पुढें काय होणार ?

त्या रात्रीं मी शराबाच्या धुंदींत निजलों ! कुणी तरी माझ्या मांड्यांवरून थंडगार हात फिरवल्याचा भास होतो. उंदीर आला म्हणून मी किंचाळत उठतो. खडबड ऐकू येते, आणि कुणाची तरी थोरली काळीकभिन्न छाया खिडकींतून अदृश्य होते. सताड उघडलेल्या खिडकींतून चांदण्या लुकलुकतांना दिसतात ! वाऱ्याची थंडगार पाण्यावरून आलेली झुळूक मस्तक शांत करते. मी उठून दिवा लावतो आणि माझी, ड्रेसिंग टेबलाकडे नजर जाते. फेरिवाल्याकडून मिळालेली मोड, पंधरा एक रुपये, टेबलावर मी रात्रीं झोपतांना टाकलेले असतात, ते नाहींसे झालेले असतात ! सलीमाला जें हवें होतें तें मिळालेलें दिसतें. पण मला जर सलिमा खरोखरच हवी असती तर तेव्हढ्या पैशांत सात वेळां मिळाली. असती पाठी राहिलेल्या दुर्गंधीनें माझी निद्रा चाळवली जाते !

● ● ●






अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



श्री. प्रभाकर पाटील, अमरावती.

**प्रश्न : खरें प्रेम कसें ओळखावें ?**

**उत्तर :** खरें प्रेम 'कल्चर्ड' नसतें.

श्री. वल्लभ तु. गुर्जर, पुणें.

**प्रश्न : वृत्तपत्रांत 'वाचकांचा पत्र-व्यवहार' ह्या सदरांत येणारें लिखाण साहित्यांत बसूं शकतें काय ?**

**उत्तर :** सहीनिशीं प्रसिद्ध होणारें तें साहित्य ह्या व्याख्येप्रमाणें वृत्तपत्रांतलें हेंच सदर फक्त साहित्य ठरूं शकतें.

**प्रश्न : स्त्रियांप्रमाणें पुरुषांनीं लग्न झाल्याची खूण म्हणून मंगळसूत्राप्रमाणें गळ्यांत कोणतें चिन्ह बाळगावें ?**

**उत्तर :** खरं म्हटलं तर चेहऱ्यावरूनच विवाहित पुरुष ओळखतां येतो. पण आवश्यक असेल तर गळ्यांत दावें बांधण्याची प्रथा पाडल्यास धेनुवल्लभ आपोआप ओळखला जाईल.

**प्रश्न : स्त्रियांना डोहाळे लागतात तसे पुरुषांना कांहीं कसें होत नाहीं ?**

**उत्तर :** आमच्या माहिती प्रमाणें पुरुषांना कृतकर्माचा पश्चाताप होत असतो.

श्री. सुधाकर भगवंत देशपांडे, जबलपूर

**प्रश्न : मुलींचे सौंदर्य व आकर्षकता वयाच्या अठराव्या वर्षानंतर कमी कमी होत जाते ह्याचीं कारणें काय ?**

**उत्तर :** अठराव्या वर्षानंतर त्या नोकरी करण्यास पात्र ठरतात व प्रवृत्त होतात म्हणून

**प्रश्न : टक्कल पडण्याचें कारण चिंता असते हें खरें काय ?**

**उत्तर :** होय. टक्कल पडल्याची चिंता !

**प्रश्न : एकाला जीवन आनंदमय वाटतें तर त्याच परिस्थितींतल्या दुसऱ्याला तें नीरस वाटतें, ह्याचा अर्थ काय ?**

**उत्तर :** प्रत्येकाचा चष्मा निरनिराळा असतो म्हणून.

श्री. अरविंद शंकर करंदीकर, बोरिवली

**प्रश्न : जानेवारीच्या प्रश्नपंचाइतींत आपण गोपाळरावाचा 'विध्वंस' कां केलांत ? 'विद्वांसा' चा 'विध्वंस' कसा झाला ?**

**प्रश्न :** गोपाळरावाच्या विध्वंसाला सर्वस्वीं त्यांचे पूर्वज जबाबदार आहेत.

(तीन पिढ्यापूर्वी पेशव्यांच्या सेवेंत असतां आमच्या पूर्वजांच्या विद्वत्तेचा विध्वंस झाला असें म्हणतात. ज्या वेळीं गोखल्यांचे रास्ते झाले त्याचकाळीं विद्वांसाचा विध्वंस झाला— श्री. गोपाळराव विध्वंस. )

**प्रश्न : आधीं संपादक कीं आधीं मासिक ?**

**उत्तर :** छे छे आधीं वाचक !

**प्रश्न : सरकारनें कोर्डी बंद केली, लॉटऱ्या बंद केल्या, मग प्राइझ बॉंडस् हे काय आहेत ?**

**उत्तर :** जुगाराचें राष्ट्रीयीकरण.

---

वाचकांना अडलेल्या चमत्कारिक प्रश्नांना उत्स्फूर्त उत्तरें देण्यासाठीं प्रस्तुत सदराची योजना सुरू होत आहे. मराठी साहित्यांतले एक अष्टपैलू लेखक वाचकांकडून येणाऱ्या प्रश्नांस उत्तर देण्यास सिद्ध झाहले आहेत. मात्र ह्या शरसंधानामुळें वर्मी घाव बसल्यास त्याचें पाप माथीं नको म्हणून तूर्त अनामिक अवस्थेंतच त्यांनी हें कार्य पत्करलें आहे. वाचकांनीं आपले सुबोध प्रश्न सुवाच्य अक्षरांत लिहून पाठवावे. अवाच्य प्रश्नांना उत्तरें दिलीं जाणार नाहींत.

---

**प्रश्न : नवकवि कसा ओळखावा ?**

**उत्तर :** नच करी चुकुनि कधीं स्नान जो ।
कच शिरीं दृढ दाढी वद्ध तो ॥
बघ द्विनेत्र आरक्त खप्रासि कीं ।
अवतरे कलियुगीं जणु वाल्मिकी ॥

श्री. द. मु. भट, जव्हार

**प्रश्न : अचूक शरसंधान करून वर्मीं घाव घालणें हें पाप आहे काय ?**

**उत्तर :** आजच्या अणुयुगांत शरसंधान करणें हें भ्याडपणाचें लक्षण आहे. अलिकडे

मदनानेंसुद्धां शरसंधान करण्याचें सोडून दिलें आहे, कारण त्याच्या लक्ष्याचें लक्ष वर्माविरून लक्षांकडे गेलेलें आढळतें.

**प्रश्न :** अर्वाच्य म्हणजे काय ?

**उत्तर :** ठळक टाईपांत छापलेल्या पण चोरून वाचावयाच्या मजकुराला अर्वाच्य असे म्हणतात.

**श्री. माधव भिकाजी मेळेकर,** जैतापूर.

**प्रश्न : भारतीय लोक मोठमोठ्या अधिकारपदावर कां दिसत नाहींत ?**

**उत्तर :** ते विरोधी पक्षांत असतात म्हणून.

**श्री. देवराम सिताराम रायपुरे,** दापोरा

**प्रश्न : आजकाल जगांत जो खरें बोलतो त्याची बाजू असत्य ठरते व जो खोटें बोलतो त्याची बाजू सत्य ठरविली जाते ह्याचें कारण काय ?**

**उत्तर :** सत्तेच्या सट्टाबाजारात सत्याला भाव नाहीं म्हणून.

**श्री. यशवंत वामन काढे,** उरण

**प्रश्न : पुरुषाला गुळगुळित टक्कल पडते पण स्त्रीला कां पडत नाहीं ?**

**उत्तर :** टक्कल फक्त बुद्धिमानालाच पडतें म्हणून.

**प्रश्न : सौंदर्य ही ईश्वरी देणगी कीं शाप ?**

**उत्तर :** पुरुषाला सौंदर्य ही देणगी आणि स्त्रीला सौंदर्य हा शाप.

**प्रश्न : गांधीजी कॉंग्रेसमध्यें होते तरी ते टोपी कां वापरत नव्हते ?**

**उत्तर :** गांधी कॉंग्रेसमध्यें येण्यापूर्वी टोपी वापरत होते. कॉंग्रेस सोडल्यानंतर त्यांनीं टोपीहि सोडली.

**प्रश्न : बुद्धिमान होण्यास काय करावें ?**

**उत्तर :** बेकार होऊन राष्ट्रसेवा करावी.

**श्री. यशवंत केशव जांभेकर,** पापडी

**प्रश्न : मासिकांवर स्त्रीचें मुखपृष्ठ कां असतें ?**

**उत्तर :** वाचकांनीं फक्त तेवढेंच फाडावें म्हणून.

## स्वाक्षरीची किंमत



डेन्मार्कचे प्रख्यात कवि जॉन शेड एकदां एका पुस्तकाच्यादुकानांत गेले व स्वतःचेंच एक पुस्तक उचलून पाहूं लागले. नंतर कोणाची नजर नाहीं असं पाहून त्यांनीं त्या पुस्तकावर स्वाक्षरी केली व मग तें पुस्तक घेऊन ते दुकानदाराकडे गेले व त्या पुस्तकाची किंमत किती म्हणून त्यांनीं विचारलं.

'दहा क्राउन. लिहिली आहे तिथं' दुकानदार निर्विकारपणें म्हणाला.

'पण ह्या प्रतीची....किंमत जास्ती असेल.' कवि महाशय म्हणाले 'कारण ह्यावर कवीची स्वाक्षरी आहे.'

'माफ करा' दुकानदार म्हणाला 'मी तुम्हाला दुसरी प्रत देतो. कुणी तरी गाढवानं त्यावर कांहींतरी लिहिलंय् व पुस्तक खराब केलंय्.'

• • •

**प्रश्न : स्त्रियांना जास्त चांगलें काम कोणतें साधतें – सैंपाक कीं सेवा?**

**उत्तर :** आधुनिक स्त्रियांना कांहींच साधत नाहीं.

**श्री. व्ही. एन्. म्हात्रे,** उरणचोरी

**प्रश्न : माणसाला नेहमीं कोणतें सुख हवेसे वाटत असतें ?**

**उत्तर :** जें मिळत नसतें तें.

**प्रश्न : स्त्रियांना मिशा कां येत नाहींत ?**

**उत्तर :** पूर्वी ज्यावेळीं स्त्रियांना मतें नव्हती त्या काळीं त्यांना मिशाहि नव्हत्या, अलिकडे लोकशाहींत स्त्रियांना मतें मिळाल्यापासून मिशाहि उगवूं लागल्याचें दिसतें.

**कु. शैला करकरे,** भुलेश्वर

**प्रश्न : स्वतःचे प्रश्न स्वतःच सोडवण्याचा प्रयत्न करणारा माणूस शेवटीं कुठें जाण्याचा संभव असतो ?**

**उत्तर :** सोनापूरांत.

**प्रश्न : 'संताच्या बायका कजाग होत्या म्हणूनच त्यांच्या गुणाचा कस वाढला' म्हणून स्त्री कजाग असणेंच बरें असे म्हणणाऱ्यांना काय म्हणावं ?– स्थितप्रज्ञ कीं मूर्ख ?**

**उत्तर :** स्वसंरक्षणाची खरी जाणीव असणारा दुबळा पुरुषही !

**श्री. हरि पंढरीनाथ वड्डरकर,** वड्डर

**प्रश्न : मूल, फूल व राष्ट्र ह्या तिघांत साम्य आहे काय ?**

**उत्तर :** होय. तिघांचेंहि कुणीतरी संरक्षण करणें इष्ट ठरतें.

**प्रश्न : मित्र आणि शत्रू ह्यांत अंतर काय ?**

**उत्तर :** नेहमीं भेटणारे मित्र शत्रूसारखा वाटतो. तर क्वचित् वाटेला जाणारा शत्रू हा मित्रासारखा भासतो.

**प्रश्न : आजच्या पुढाऱ्यांच्या आधारें राष्ट्र जगतें काय ?**

**उत्तर :** छे छे उलट राष्ट्राच्याच आधारें पुढारी जगतात.









# इन्क्विझिशन



प्रसिद्ध संशोधक श्री. प्रियोळकर यांचा 'इन्क्विझिशन' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला आणि गोमंतकाला स्वातंत्र्य मिळालें; ही एक योगायोगाची गोष्ट झाली. **डॉ. श्री. शां. आजगांवकरांनीं** या ग्रंथाचे केलेलें हें रसग्रहण.

डिसेंबरच्या दिनाक १९ ला–नाताळच्यापूर्वी भारतांतील पोर्तुगीज सत्तेचा शेवटचा अवशेष भारतीय सेनेने दिव दमण आणि गोवा यांच्या विमुक्तिने नाहींसा केला व ४५० वर्षांनीं गोवा स्वतंत्र झाला–भारतीय जनतेशीं एकरूप झाला. भारतामध्यें प्रवेश करणाऱ्या पाश्चात्य राष्ट्रात पोर्तुगाल सर्व प्रथम होते आणि सत्तांतर करण्यांत सर्वांत शेवटचें. आज गोमंतक पोर्तुगालच्या साम्राज्याचा भाग राहिला नसून भारताचा अविभाज्य घटक बनला आहे. वनवासी राम अयोध्येंत आला. अशा केळीं गेल्या ४५० वर्षांत तेथील हिंदू जनतेला कोणत्या दिव्यातून जावे लागले, तेथें अपमानास्पद जिणे कसे काढावे लागले व अशाहि परिस्थितींत स्वधर्म आणि स्वभाषा त्यानीं कशी टिकविली याची आठवण होणें स्वाभाविक आहे व त्या दृष्टीनें प्रा. अनंत का. प्रियोळकर यांचे नुकतेच प्रसिद्ध झालेले गोवा इनक्विझिशन हे पुस्तक अभ्यसनीय आहे. ख्रिस्तिधर्माच्या उच्च तत्वांची पायमल्ली धर्माच्या नांवाखाली सत्तेच्या जोरावर धर्मगुरू व राजेलोक कशी करीत होते याचे विदारक चित्र आपल्यासमोर या "इन्क्विझिशन"च्यां इतिहासाने यते. प्रस्तुतचा लेख या पुस्तकाच्या आधारानेच लिहिला आहे.

पोर्तुगिजानी गोवां जिंकल्यावर काहींकाळ गोव्यातील हिंदु जनता आणि पोर्तुगिजविजेता. अल्बुकर्क यांचे सुरुवातीचे संबंध फार चांगले होते पण पोर्तुगिजान्ची सत्ता जसजशी स्थिर होऊं लागली तसतसा त्यांचा धर्मांधपणा प्रत्ययास येऊं लागला. हिंदी जनता बाटवून ख्रिस्ति करावी हिंदू धर्ममंदिरें पाडून ख्रिस्ती चर्चें बांधावी हा उपक्रम अल्बुकर्कच्याच कारकिर्दींत सुरू झाला. पण ख्रिस्तीं करणाची खरी जोरदार सुरुवात इ. स. १५४० पासून झाली आणि मिंगॉल वाझ या धर्मोपदेशकाने धार्मिक छळाच्या सुरुवातीचा पाया घातला असे म्हणण्यास हरकत नाहीं. गोमांतक पोर्तुगिजानी काबीज केल्यावर तीस वर्षें होऊन गेली तरी ख्रिस्तिधर्माचा हवा तसा प्रसार झाला नाहीं म्हणून धार्मिक उन्नति व दयेचा मार्ग ( Rigouer of mercy ) चोखाळण्याचे ठरविलें गेलें. मार्ग चुकलेल्या लोकाना पवित्र शास्त्राची शिकवण देण्याअगोदर त्यांची धर्म मंदिरे नष्ट केली जात असत व त्याच्या देवस्थानाची मिळकत जमिनजुमला व पैसे स्वखुशीनें अगर बळजोरीनें ताब्यात घेतली जात असे. तसेच बाटविलेल्या लोकाना–नवख्रिस्तांना–धर्मशिक्षण शिकविण्यासाठीं सेंट पॉलचे कॉलेजहि काढण्यांत आलें व त्याचा खर्च हा वरील भ्रष्ट व नष्ट केलेल्या हिंदू देवालयांच्या मिळकतीतून केला जात असे. इ. स. १५४० पर्यंत पोर्तुगिजांचा अमल गोव्याचे बेट व त्यालगतची तीन छोटी बेटे येथपर्यंतच होता. इ. स. १५४३ मधे बार्देश वें साष्टी प्रांत त्यांच्या ताब्यांत आले व इ. स. १५४६ पासून तेथील संपन्न हिंदू देवालयांवर पोर्तुगिजांची वक्रदृष्टि वळू लागली व तीं नष्ट करण्यांत येऊं लागली. अशी नष्ट केलेल्या देवळांची संख्या २८० चेवर होती. इतकेंच नव्हे तर जुनी नादुरुस्त देवालयांची सुधारणा करूं नये वं नवीन देवालये बांधू नये असाहि कायदा करण्यांत आला. यामुळें स्थानिक जनतेंने स्थलांतर करून पोर्तुगिजांची सत्ता नसलेल्या भागांत नवीन देवालय स्थापन करण्याचें सुरू केलें. एवढा धर्मछळ करूनहि ख्रिस्ती धर्माचा प्रसार व्हावा तसा होत नाहीं हें पाहून ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी इ. स. १५६० ला धर्मप्रसारास सहाय्य व्हावे म्हणून "इन्क्विझिशन"ची स्थापना केली. या गोष्टीस गतवर्षी बरोबर चारशें वर्षें झालीं व गेल्या नाताळापूर्वी गोमांतक पोर्तुगिजांच्या टाचेखालून मुक्त झाला. अशा यासमयी **हृदयास थरकाप करणाऱ्या धर्मांधतेचा कळस** अशा "**इन्क्विझिशन**"ची थोडीशी माहिती झाल्यास आपल्या पूर्वजांनीं कशा छळास तोंड देऊन आपली भाषा व धर्म जतन केले व आपलें या विषयींचे काय कर्तव्य आहे याची जाणीव होईल. प्रा. अ. का. प्रियोळकर यानीं साधार व सखोल अभ्यास करून "इन्क्विझिशन इन गोवा" हा ऐतिहासिक ग्रंथ लिहिला आहे व ख्रिस्ती धर्माच्यां या काळ्याकुट्ट अंगावर साधार प्रकाशझोतें पाडला आहे. त्याचा अभ्यास इतिहास, संस्कृति आणि धर्म या विषयाच्या विद्यार्थ्यांनीं करणें अवश्य आहेचं पण सामान्य नागरिकांनाही ख्रिस्तीधर्मातील तत्व आणि तपशील यांचे दर्शन होण्यास हा ग्रंथ फार उपयुक्त ठरेल. खालील माहिती व प्रस्तुतचा लेख हा त्यांच्या वरील पुस्तकांच्या आधारेच लिहिला आहे व श्री. प्रियोळकराचे पुस्तक चोखंदळ वाचकानी अभ्यासावे या हेतूनेच हा लेख लिहिण्याची यासमयी संधी घेतली आहे.

### इन्क्विझिशनचा उगम—

स्पेन व पोर्तुगालच्या कॅथॉलिक पंथांतील धर्मगुरूनीं नवख्रिस्ती लोकांतील धर्मलंडपणा













नाहींसा करण्याचा उपाय म्हणून " इन्क्विझिशन "ची स्थापना केली. मूळपुरुष ॲडम आणि इव्ह यांना ईश्वराची आज्ञा मोडल्याचे प्रायश्चित म्हणून पृथ्वीवरील दुःखे भोगण्याची शिक्षा दिली तो शिक्षा देणारा ईश्वर हा ख्रिस्ती-धर्मशास्त्राप्रमाणें पहिला; " इन्क्विझिटर " समजला जातो. कांहीं ख्रिस्ती धर्म इतिहासकारांच्या मतें क्रुसेडस् ( धर्मयुद्ध )च्या नंतर तेराव्या शतकांत **पोपच्या** कॅथॉलिक पंथीय धर्मगुरुंचीं अधिसत्ता न मानणाऱ्या धर्मलंड लोकास शिक्षा करण्यासाठीं या इन्क्विझिशनच्या प्रथेचा उगम झाला. ख्रिस्ताच्या महान् तत्वांचा विसर पडून केवळ धर्माच्या नांवाखालीं आपली अधिसत्ता कशी बळकट राहील हें पहाण्यासाठींच धर्मगुरुंनीं त्याच्या मतें जे बंडखोर अधार्मिक असतील त्यांना नेस्तनाबूद करण्यासाठीं इ.स. १२२९ सात इन्क्विझिशनची स्थापना केली. त्याचे विचारविनियमाचे पहिल्याच परिषदेत ४५ ठराव पसार करण्यात आले. त्यांतील कांहीं महत्वाचे ठरावांचाच खालीं उल्लेख करण्यात येत आहे.

( १ ) बिशप व आर्च बिशप यानीं आपल्या परिसरामधील ( Parish ) एक ख्रिस्ती पाद्री व दोन अगर तीन ख्रिस्ती गृहस्थ याची समिति नेमावी त्यानीं धर्मविरोधी ( Hereties ) लोकांची माहिती काढणें, त्याचे पाठिराखे पुरस्कर्ते व भक्त यांची माहिती काढणें व अशा व्यक्तींची नावें बिशप व मॅजिस्ट्रेटला कळवून त्यांना शिक्षा होईल असें करणे, व ते पळून न जातील असें पहाणें.

( २ ) सरदार, जमीनदार व मठाचे अधिकारी याना त्यांच्या परिसरात कोणी ख्रिस्ती धर्माविरुद्ध वागत असलेला इसम आढळल्यास त्याचा मागोवा घेऊन त्यास शोधून काढून पकडून मग धर्म गुरूंच्या स्वाधीन करण्याची आज्ञा दिली होती.

( ३ ) जो कोणी अशा धर्मविरोधी व्यक्तींना आसरा देईल तोहि शिक्षेला पात्र होईल. शिक्षेदाखल त्याची मालमत्ता जप्त केली जाईल इतकेंच नव्हे तर शारीरिक दंडासही तो पात्र राहील.

( ४ ) ज्या व्यक्तीच्या घरांत असा धर्मविरोधी गृहस्थ आढळेल त्याचे घरहि नष्ट करण्यांत येईल.

ख्रिस्ती धर्माच्या प्रचाराला ज्या ज्या कृत्यानें अडथळा येईल अशा कोणत्याहि कृत्याबद्दल ते कृत्य करणाऱ्याला शिक्षा छळ कसे करावे याचे सांगोपांग तंत्र या सभेने ठरविले व त्यांत पुढती पुढती सुधारणा होत गेली.

धर्मगुरू आणि राजसत्ता यांच्या सहकार्यानें प्रस्थापित ख्रिस्ती धर्माविरुद्ध आचार विचार असणाऱ्या तथाकथित बंडखोर व्यक्ति विरुद्ध पद्धतशीर छळ करण्याचे तंत्र आणि तो अमलांत आणणारा अधिकारी वर्ग याची घटना तयार करण्यांत आली

या इन्क्विझिशनचा प्रयोग मोठ्या प्रमाणावर १४२० ते १४९८ या काळांत स्पेनमध्ये राजा फर्डिनेंड आणि राणी इसाबेला यांचे कारकिर्दीत तेथील ज्यू लोकांविरुद्ध करण्यांत आला. तेव्हां या धार्मिक छळाला कंटाळून बऱ्याच ज्यूंनी वरकरणी ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला; तरी अंतःकरणाने व चालीरीतिने ते आपल्या मूळच्या 'ज्यू' धर्माचेच राहिले. त्यामुळें ख्रिस्तिधर्मगुरुंना व त्यांच्या हितशत्रूंना एक नवीन निमित्त हातीं पडलें. त्यांनी राजा फर्डिनेंड व राणी इसाबेलायांवर आपले वजन खर्च करून रोमच्या पोपकडून 'इन्क्विझिशन ट्रिब्यूनल' नेमण्याची मागणी करविली आणि या धर्मलंडांची चौकशी करण्याच्या न्यायालयाची कामगिरी २ जानेवारी १४८१ पासून सुरू झाली. नेमणुकीपासून चार दिवसांचे आतच सहा गांवी या न्यायालयाने ख्रिस्तधर्मविरोधी म्हणून चौघांना जाळून ठार मारावें, व ऐंशी इसमाना जन्मठेप द्यावी अशा शिक्षा दिल्या. सबंध स्पेनदेशामधे दोन हजार लोकाना जाळून ठार मारण्याची शिक्षा देण्यांत आली आहे. सतरा हजार व्यक्तिंना इतर निरनिराळ्या शिक्षा सुनावण्यात आल्या. ज्यांनी आपला धर्म सोडला नाहीं, अशा ज्यू व मुस्लिम व्यक्तिंना कनिष्ठ नागरिक म्हणून मानहानीची

Statement about ownership and other particulars about newspaper

DIPAWALI MONTHLY

**FORM IV ( See Rule 8 )**

| | | |
|---|---|---|
| 1. Place of Publication | .. .. | Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge. Bombay 4. |
| 2. Periodicity of its Publication | ................ | Monthly, on Ist of every Month |
| 3. Printer's name, | .......................... | Dinanath Damodar Dalal. |
| Nationality | .......................... | Indian |
| Address | .......................... | 42, Kennedy Bridge Bombay 4. |
| 4. Publisher's name, Nationality, Address | ................ | As per 3 above |
| 5. Editor's name, Nationality, | | |
| Address | .. .. .. .. .. .. .. .. | As per 3 abova |
| 6. Names and address of individuals who own the newspaper and partners or share-holders holding more than one percent of the Total Capital. | | No Partners or Shareholders. |

I, Dinanath Damodar Dalal hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

D. D. Dalal

Date 20-2-62 Signature of Publisher





अनुक्रमणिका

# जिवंत पुतळा



एका प्रसिद्ध देशभक्ताचा पूर्णाकृति स्टॅच्यू तयार करून शहराच्या चौकांत बसविण्यासाठीं म्युनिसिपालिटीनें ५० हजार रुपये मंजूर केले व कामास सुरवात झाली.

जेव्हां ही बातमी त्या दरिद्री देशभक्तास कळली तेव्हां तो आपल्या एका मित्रास म्हणाला 'दोस्त, म्युनिसिपालिटी जर केवळ २५००० रुपये मला देईल तर मरेपर्यंत मी त्या चौथऱ्यावर उभा राहीन.'

● ● ●

वागणूक मिळूं लागली खिस्ति धर्म स्वीकारला नाही तर देशांतर करण्याची त्यांचेवर पाळी यावी अशी वागणूक त्यांस दिली जात असे जे देशांतर करूं शकत नव्हते व बळजबरीने वा परिस्थितीचे दास होऊन खिस्ती झाले होते अशा नव-खिस्त्यांवर ते आपला जुना धर्म पाळतात कीं कसें हें पहाण्यासाठीं पाळत ठेविली जात असे व जर कांहीं संशय आला तर त्यांना धार्मिक न्यायालयाकडे खेंचले जात असे. पण अशा न्यायालयांत धर्म आणि नीतिपेक्षां अधर्म आणि अनीतिचे प्राबल्य जास्त होतें. स्पेनप्रमाणें शेजारील पोर्तुगाल मध्येहि हा नव खिस्ती व ज्यूंचा धार्मिक छळ १५४१ पासून झाला. व इ. स. १७७२ पर्यंत २३ हजार लोकांना धर्मलंडपणाबद्दल निरनिराळ्या शिक्षा देण्यांत आल्या व १४५४ लोकांना जिवंत जाळण्यांत आले.

या धार्मिक न्यायालयाच्या छळाचा शेवट १७७४ मध्यें पोर्तुगालमधे त्यावेळच्या उदारमतवादी अशा मार्केस डी पोंबल या प्रधानाने केला व १८२० मध्यें हें न्यायालय पूर्णपणें बंद करण्यात आलें.

## इन्क्विझिशनचा भारतांतील पराक्रम

पार्तुगिजांना भारतांत वसाहती निर्माण केल्यावर त्या देशातील बरेच ज्यू देखील छळाला कंटाळून पोटासाठीं म्हणून हिंदुस्थानात आले परंतु येथें सुद्धां त्यांच्या खिस्ती बधूंचा छळवाद त्याचा पाठलाग करत आला. हिंदुस्थानमध्य १५६० मधे या धार्मिक न्यायालयाची स्थापना झाली. पण भारतात असे न्यायालय असावें अशी मागणी करणारा गोव्याचा प्रसिद्ध संत फ्रान्सिस्कुझेवियर हा होता। त्याने १६ मे १५४५ च्या मोलका येथून पोर्तुगालच्या राजाला लिहिलेल्या पत्रांत भारतातील ज्यू मुसलमान व हिंदु हे खरा धर्म जाणत नाहीत व जर साम दामाने हे वळत नसले तर निदान दंड भयाने ते खऱ्या ईश्वराकडे वळतील तरी त्यासाठीं इन्क्विझिशनची नेमणूक करून शिक्षा व दंड याना तरी चुकलेली कारकेरें कळपात आणावी असें सुचविले.

इ. स. १५६० मधें ॲलेक्सि डयास फॅलकॉव याला गोव्याचा 'इनक्विझिटर' म्हणून नेमण्यांत आलें. व त्याने आपली कारकीर्द फार कडक रीतीने सुरू केली. त्याने पहिला राग नवखिस्ती ज्यूंवर काढला व संशयित व्यक्तिंना जिवंत जाळणे, त्यांची मालमत्ता जप्त करणें हा प्रकार सुरू केला. विशेषतः श्रीमंत ज्यूंवर त्याची वक्रदृष्टी त्वरित वळे. गरीबांची अल्पशिक्षेवर सुटका होई तर श्रीमंतास प्राण दंड व सर्वात्तहरण हीच शिक्षा असे. येथें न्याय नसे. फियादी व न्यायाधीश या दोनहीं भूमिका या धर्मगुरूंच्या असत. संशयित व्यक्तींस त्याचा गुन्हा कोणता हे नकळविता वर्षोवर्षी अधार काठडीत डाबले जात असे व न्याय न मिळता त्याचा शेवटाह तयेच होत असे.

या धार्मिक न्यायालयानें सुनावलेल्या शिक्षांचे वर्णन येथे देऊन वाचकाचा वेळ घेण्यापेक्षा प्रा. प्रियोळकराचे पुस्तकातील पृ. २९-३० वरील उतारे वाचणे इष्ट होईल. स्थानिक लोकांनीं या छळाचा इतका धसका घेतला होता कीं १८२० मधे जरा गोव्यातील इनक्विझिशन बंद झाली तरी त्या न्यायालयाच्या स्थानाच अवशषाकडे ही बोटानें निर्देश करण्यास लोक घाबरत असत व केवळ हाडले घार (orlem Gor) असा त्याचा उल्लेख आपल्या बोलण्यात करीत असत. असें नेरी फ्रेन्हाअर हा आपल्या १९०३ मध्य प्रसिद्ध केलेल्या पुस्तकात म्हणतो.

गोव्याच्या या धार्मिक छळाचा इतिहास प्रा. प्रियोळकरानी फार परिश्रमाने मिळविलेला आहे. कारण इनुक्विझिशनच्या बऱ्याच कागद पत्राचा नाश त्याच्या चालकांनी तें बंद होण्याच्या सुमारास केला. काहीं कागद पत्र मराठयाच्या बारदेश वरील १७३९ स्वारीच्या वेळीं झाला व काहीं कागदपत्र १७७४ चे सुमारे पार्तुगालला पाठविले गेले.

## गोव्यातील धर्मांतर

गोव्यातील हिंदू व मुसलमान प्रजेचें धर्मांतर हे स्वेच्छेने झालेलें नसून सक्ति, आर्थिक

प्रलोभन, अज्ञान आणि राजकीय सत्तेचा दुरुपयोग व छळ यामुळें झालेलें आहे. फ्रान्सिस झेविअर या जेसुईट धर्मगुरूने दिनांक ६ मे १५४२ रोजीं गोव्याच्या भूमीवर पाय ठेविला आणि गोव्यांतील धार्मिक असहिष्णुतेला उधाण आलें. जेसुईट आधींच धर्मांध आणि त्यांना राजकीय सत्तेचे गोव्यांत पाठबळ मिळाल्यावर 'एका गालावर मारल्यावर दुसरा गाल पुढें कर' हे ख्रिस्ताचें वचन पार विसरून त्या ऐवजीं लालुच, धाकदपटशा, तुरुंगवास आणि अग्निकाष्ठ यांनी धर्माचा प्रसार करण्यांत अहमिहिका दाखविली. सतीसारख्या कांहीं अनिष्ट चालीं बंद करण्यांत त्यानी पुढाकार घेतला हे लक्षांत घेऊनहि धर्मांतरित हिंदूना पूर्णपणें अराष्ट्रीय बनविणें हा त्याचा मूलभूत हेतु आणि कार्यक्रम होता. धर्मांतरामध्ये स्त्रियांच्या प्रलोभनाचाहि पुष्कळदां उपयोग केला जात असे व ती प्रथा आजहि चालू आहे. धर्मांतरितांना जास्त सवलती देणे व दुसऱ्या धर्मातील लोकांना नागरिकत्वाचें साधे हक्कहि उपभोगूं न देणे ही प्रथा त्या वेळेपासून गेल्या कांहीं वर्षापर्यंत गोव्यांत चालू होती. आपल्या धर्माप्रमाणे पूजा, लग्नसमारंभ व इतर सार्वजनिक जीवन जगणे मातृभाषेंत शिक्षण घेणे, धार्मिक विधि करणें, मंदिरे बांधणें अगर दुरुस्त करणें यांस त्यांचा कडवा विरोध होता. हिंदूंची हजारो देवस्थाने भ्रष्ट करून त्यावर त्यानी आपली ख्रिस्त मंदिरे बांधली. या देवळांची वतनें व मालमत्ता जप्त करून त्याचा आपल्या धर्मासाठीं उपयोग केला. ज्यानी त्याना विरोध केला त्याना एक तर देशांतर तरी करावे लागले अगर त्याचे घरदार जाळून फस्त करण्यांत येऊन त्यांनाहि देहदंड सोसावा लागला. गोव्यांतील धर्मांतर व धार्मिक छळ याचा पद्धतशीर प्रचार करण्याचें श्रेय मिगॅल वाझ या धर्मगुरूस देतां येईल. धर्मांतरित लोकांनी जुन्या धर्मातील चालीरीति पूर्णपणें टाकून नव्या चालीरीतिप्रमाणें वागणे कीं ज्यामुळें त्यांचे केवळ हिंदुत्व नव्हे तर भारतीयत्वहि नष्ट होईल. आहार, विहार, कपडे, आपली नावेंवकुलनांवे यांत त्यांनी या नवख्रिस्त्यांना बदल करावयास लावला इतकेच नव्हे तर स्वतःच्या रक्त संबंधियांशीहि संबंध तोडण्यास भाग पाडले. गोव्यांचे इनक्विझिशनचे नियम प्रा. प्रियोळकरानी सविस्तररित्या पृ.९०ते १०० वर दिलेले आहेत त्यावरून वरील विधानाची सत्यता प्रतीत होईल. ज्या कोणास वरील नियमाची अंमलबजावणी नीट होत नाहीं असे आढळेल त्याने ही गोष्ट इनक्विझिशनचे मुख्याधिकाऱ्यास कळविणें हे त्याचें कर्तव्य समजले जाई. त्यामुळें खासगी द्वेषानें पुष्कळ ख्रिस्ती लोकच नव्हे तर हिंदु लोकहि आपल्या प्रतिपक्षियांची नांवे या धर्मन्यायालयात कळवित असत, हेरगिरी कळलावेपणा हा एक धंदाच होऊन बसला होता न सामाजिक स्थिरता, सामंजस्य पार नाहींसे होऊन गेले होते. यामुळें बरेच हिंदु लोक उत्तर अगर दक्षिण कोंकणांत देशांतर करून गेले.

असा आहे हा गोव्यांतील इन्क्वीझिशन–धार्मिक छळाचा इतिहास. हा इतिहास सिद्ध करून धर्मांधता मानवतेला कशी पायदळीं तुडविते हे प्रा. अ. का. प्रियोळकर यांनी आपल्या पुस्तकांत साधार दाखविलें आहे. निःपक्षपाति इतिहासकार श्री. प्रियोळकराची ही संशोधनात्मक अमोल सेवा इतिहासांत योग्य ते स्थान देऊन तिला मान्यता देतील अशी खात्री वाटते. • • •




*घाशीराम कोतवाल यांच्या कथांनीं हा कनोजी ब्राम्हण किती उथळ, किती निर्बुद्ध होता आणि तरीहि हा उच्च पदस्थ होता, तेव्हां* Wrong men are some time placed at the top *हें आज अनुभवास येणारें सत्य निदान 'पेशवाई इतकें पुरातन आहे हें सिद्ध केलें.*

# इ न्सा फ

एके दिवशीं घाशीराम कचेरींत इनसाफ करीत बसला होता. तेथें संती या नांवाच्या एका स्त्रीनें रडत येऊन अशी फिर्याद केली कीं माझी शेजारीण ज्यानवीं माझें पोर जबरदस्तीनें घेऊन वानवडी येथें आपल्या माहेरास चालली आहे. त्यावरून कोतवालानें स्वार पाठवून ज्यानवीला पोरासुद्धां धरून आणलें आणि तिला मजकूर विचारला. तेव्हां तिनें सांगितलें कीं हें पोर माझें असून संती उगाच गळां पडत आहे. मग कोतवालानें पक्षकारांपासून आपआपला पुरावा मागितला आणि त्यांनीं लिहून दिल्याप्रमाणें सुइणी व दुसरे लोक बोलाविले. त्यांच्या साक्षी घेतल्या, त्यावरून असें कळलें, की सेती व ज्यानवी यां उभयतां एकमेकींचे शेजारीं शुक्रवार पेठेंतील राहणाऱ्या आहेत व उभयतांचे नवरे मोहिमीवर एक वर्षावर गेले, तेव्हां दोघीजणी गरोदर होत्या. त्या दोनतीन दिवसांच्या अंतरानें प्रसूत होऊन उभयतांस मुलग्या झाल्या. त्या एकमकींचे घरीं नेहमीं जात येत असत. संतीचे आप्त दोघेजण होते. त्यानीं हें पोर संतीचें असें सागितलें आणि ज्यानवीचें लगतीचे तिघेजण होते, त्यांनीं सांगितलें कीं हें पोर ज्यानवीचें आहे. त्यावरून कोतवाल यानें बोलण्यास प्रारंभ केला.

कोतवालः—अगे संते, ज्यानवीच्या वतीचे साक्षीदार जास्ती आहेत, यावरून तूं लबाड आहेस आणि ज्यानवी खरी आहे असें टरलें. तर बालंट घेतल्याबद्दल तुझी धींड काढली पाहिजे.

संती :—महाराज नाहीं, महाराज नाहीं. मी खोटी नाहीं. ज्यानवी इनें आपली मुलगी खुदाबक्ष नायकीणीला दोनश रुपायांस दोन दिवसांपूर्वीं विकत दिली. पाहिजे असल्यास मी आणखी दोन साक्षीदार जास्ती आणतें.

कोतवाल : — ही नायकीण आम्हांस माहीत आहे. ती मुळची मराठीण होती. ती त्रिकाळ स्नान करीत असते. तिनें स्वयंपाकास ब्राम्हण ठेविले आहेत. ब्राम्हणांवाचून दुसऱ्याचे हातचें पाणी देखील ती घेत नाहीं. तिचें सोवळें फार आहे. एकादशीस निरशन करून दिवसभर घोंगडीवर बसून ती पुराण श्रवण करीत असते. तिच्या घरीं रात्रीस फराळास पंडवी येते. द्वादशीस ती वैदिक व शास्त्री वगैरे यांस एक एक रुपया दक्षणा व सिधा दिल्यापूर्वी अन्नास शिवत नाहीं. यास्तव ती ह्या ज्यानवी मुसलमाननीची पोर घेईल असें कधीं घडायचें नाहीं. आतां एकमेकांपेक्षां अधिक साक्षीदार तुम्ही देऊं पाहतां, तेव्हां तुम्ही दोघीहि खोट्या आहांत. तर तुम्ही ही पोरगी बजा नायकिणीचे हवालीं करावी. ती तिजला मोठी करून गावयास व नाचावयास शिकवील म्हणजे तिचा वंश चालू राहील.

ह्या प्रमाणें कोतवाल यानीं सांगून बजा नायकिणीस बोलवणें पाठविलें. हा सर्व प्रकार चालू असतां, तेथें इदापूरचे काझी **सय्यद हमी युद्दीन** बसले होते. त्यांस कोतवालाचा न्याय नीट वाटला नाहीं. परंतु कोतवालास तसें स्पष्ट म्हणतां येईना. यास्तव काझी यानीं **घाशीराम** याचे कानाशीं लागून सांगितलें कीं या पोरी विषयीचें तंट्याचा निर्णय करण्याचें काम मला सांगाल तर मी करतों तेव्हां काझीचे वयाकडे पाहून कोतवालानें रुकार दिला. मग काजीनीं ज्याबद्दल तक्रार पडली होती तें मूल आपलेजवळ घेऊन प्रथम संतीजवळ दिलें व तिला त्यास पाजावयाय सांगितलें. तेव्हां तें मूल तिला झोंबून स्तनपान करूं लागलें. नंतर तिजपासून घेऊन ज्यानवीपाशीं दिलें. तिचेंहि स्तनपान त्यानें केलें. पुढें काझीनें मूल आपले जवळ घेऊन संतीस व ज्यानवीस कचेरीबाहेर घालविलें, आणि एका कसायास मोठा सुरा घेऊन बोलाविलें, नंतर ज्यानवीला आंत बोलावून काजींनीं सांगितलें कीं पहा, झालेले पुराव्यावरून हें मूल तुमचें दोघींचें ठरत आहे. यास्तव त्या मुलाचें बरोबर वांटे झाले पाहिजेत. तर हा कसाई उभा आहे. याचे हातानें पोराचे बरोबर दोन तुकडे करवितों. तुझा एक साक्षीदार जास्ती आहे यास्तव तुला उजवेबाजूचा तुकडा मिळेल. त्यास आतां तुझी तक्रार कांहीं राहिली आहे किंवा कसें ? ज्यानवीनें उत्तर दिलें कीं बरें आहे, माझी तक्रार राहिली नाहीं. नंतर संतीस हाक मारून काजींनी त्याप्रमाणें मजकूर सांगून तुला डावेकडील अंश मिळेल, असें बोलतांच, संतीने किंचाळून सांगितलें कीं, मला कोणताहि विभाग नको, मुलाचे तुकडे न करतां तें जिवंत सरकारांनीं **ज्यानवीचे** हवालीं करावें, माझी कांहीं, तक्रार नाहीं. पाहिजे तर मी फारकत लिहून देतें.

कोतवाल :– काजीसाहेब मी म्हणत नव्हतो की, ही संती खोटी आहे ? पहा आतां आपणच होऊन फारकत देण्यास कबूल झाली आहे.

कोतवालचें बोलणें ऐकून सर्व लोक हासूं लागले. मग काजींनी तंट्याचें मूल निःसंशयपणें संतीचे आहे. कशावरून हे कोतवालाला समजावून दिलें. तेव्हां कोतवाल-साहेबहि उमजले आणि त्यानीं तें मूल संतीचे हवालीं केले.

●●●











'छे: याच्यासारख्या दिव्य चिरंजीवाचा सांभाळ करायचा म्हणजे मोठं कठीण काम! हेंच पहा ना, त्याचे हे कपडे स्वच्छ नी नीटनेटके राखायचे म्हणजे ते धुण्यातच सारा दिवस घालवायला हवा! पण सुदैव माझं, कीं सनलाइट साबण आहे हाताशीं! त्याच्या त्या विपुल फेसानं या बाळ्याचे कपडे एकदम साफ स्वच्छ होतात. केवळ शुद्ध साबणानंच कपडे हे असे स्वच्छ नी अल्प श्रमांत धुवून निघतात!'

नव्या दिल्लींत भगतसिंग मार्केट फ्लॅट नं. ५४ येथें राहत असलेल्या श्रीमती कमला वाधवाणी म्हणतात, 'धुलाईच्या कामीं सनलाइटची सर अन्य कुणालाच येणार नाहीं.'

# सनलाइट




आपल्या कपड्यांना फारच हितकर!

S. 31-X52 MA

हिंदुस्तान लिव्हरचे उत्पादन










# असा आहे यांचा स्वभाव

*मी एक पत्र लिहिलं, पोष्टांत टाकलं आणि विचारांनी उचल खाल्ली. या तरुण मुलाला मी जवळ घेऊं शकेन का? माझ्या पदरानं त्याचे डोळे पुसूं शकेन का? विचित्र विवेशता होती माझ्या मनांत. माझं मन एका अननुभूत प्रसव पीडेनं भरून आलं होतं.*

आणि त्या दिवशीं मी खूप दमलें होतें. कितीतरी वेळ मंडईत हिंडलें होतें मी. पिशव्या जड झाल्या होत्या. हात कसा अवघडून गेला होता. सगळा स्वैयंपाक व्हायचा होता. मी भराभरा पावलं उचललीं.

'मी घेऊं कां पिशव्या?' कुणीतरी म्हणालं.

मी मागें वळून पाह्यलं. एक तरूण मला विचारत होता, 'मी घेऊं कां पिशव्या!'

'अं–हं–थँक्स.' आणि मी पुढें सरकलें.

'द्या ना, खूप जड आहेत पिशव्या आणि तुम्हीं दमलां पण आहांत.'

'नको.' मी म्हणालें. हो, पिशव्या घेऊन पळून गेला तर पांचसहा रुपयांची मंडई जायची. हल्लीं कुणाचाच भरंवसा राह्यला नाहीं.

'प्लीज...' आणि त्यानं माझ्या हातांतल्या दोन पिशव्या घेतल्या. त्याच्या डोळ्यांतला तो बालिश आग्रह आणि चेहऱ्यावरच्या त्या शिशुरेखा, मी त्याच्या बरोबर चालूं लागलें.

'तुमचं नांव?'' मी विचारलं.

'पराग...'

मला वाटलं, आतां तो माझं नांव विचारणार. पण—

'गीताताई ती पिशवी पण द्या न!'

'आ!' मी दचकलें होतें. याला माझं नांव काय बरं माहित.

'डाव्या हाताला'...मी वळणावर म्हणालें.

'माहित आहे मला,' आणि तो भरा भरा चालत आमच्या दाराशीं येऊन उभा राह्यला.

ह्यांनीं दार उघडलं, माझ्या बरोबर एक समवयस्क अनोळखी तरुण, त्याच्या हातात भाजीच्या पिशव्या...पण हें कुसले! मिठास हास्य करून म्हणाले, 'या. याना बसा.' मी कांहींच बोललें नाहीं. पिशव्या घेऊन स्वैयंपाकघरांत वळले तों हे म्हणाले, 'ए गीता, चहा कर ना आज प्रथमच आले आहेत हे आपल्याकडे.' मी गॅस पेटवला. बाहेरचं दोघाचं बोलणं माझ्या कानावर पडत होतं. जणूं बऱ्याच वर्षांचे मित्र भेटले होते. संजु आणि अंजु–माझ्या दोन्हीं मुलांशी पण त्याची गट्टी जमली होती. चहा झाला. तो जायला निघाला, ' मी म्हणालें 'फार आभारी आहे मी' तो कांहींच बोलला नाहीं पण त्याच्या डोळ्यांत एक घायाळ भाव चमकून गेला. मला काय वाटलं कुणास ठाऊक. माझ्या नकळतच मी म्हणालें, 'संध्याकाळीं जेवायला या.' तो नाहीं हो म्हणायच्या आंतच हे म्हणाले, 'खरंच गीता, छान कल्पना आहे. पराग याच तुम्हीं जेवायला,' त्यानं यायचं कबूल केलं आणि तो निघून गेला.

पराग गेल्यावर मला वाईट वाटलं होतं, हे विचारतील, हा कोण, कुठला, तुझ्या ओळखीचा कसा? पण छे, एक शब्द नाहीं.

असला आहे ह्यांचा स्वभाव!

त्यानंतर परागचं आमच्या घरीं येणं–जाणं वाढलं. तो आमच्या कुटुंबापैकींच झाला. आमच्या अंजूला तर मामाशिवाय क्षणभर चैन पडायची नाहीं. एक दिवस तो आला नाहीं तर हे चार वेळां विचारायचे मला. गेले आठ दिवस तो आला नव्हता. मी रोज त्याची वाट पाहत होतें. पण बोलत मात्र नव्हतें. आणि शेवटीं यांनीं विचारलंच, 'अग, गेले आठ दिवस पराग आला नाहीं तो.' मला राग कां आला कुणास ठाऊक. मी म्हणालें, 'मला काय माहित? असेल आजारी–बिजारी. साऱ्या गांवाचा मक्ता घेतला नाहीं आपण.'

महिना झाला, त्याचा थांग पत्ता नव्हता. हे जणूं काय त्याला विसरून गेले होते. चुकुन नांवमुद्धां काढलं नाहीं त्याचं. पुरुष हे असलेच पण मी मात्र त्याला विसरूं शकत नव्हतें. एक दिवशीं असाच संध्याकाळचा तो आला होता. मी पटकन टॉवेल त्याच्या हातांत देत म्हटलं होतं, 'डोकं पुसून टाका. पडसं होईल.' तो



अनुक्रमणिका



कांहींच बोलला नाहीं. पण तो माझ्याकडे क्षणभर एकटक पाहात राहिला. त्याचे डोळे भरून आले होते. त्याच्या त्या बरसणाऱ्या डोळ्यांचा अर्थ आज पण लागत नाहीं मला. हा एखाद्या लहान मुलासारखा एकाएकी रडायला कसा लागतो !

एके दिवशीं असाच दुपारचा आला होता पराग. मुलं शाळेंत आणि हे ऑफिसांत. तो येतांच मी म्हटलं, ' या ना. '

' गीता, अहो–जाहोच्या दूरस्थ शीलेवर किती दिवस बसवून ठेवणार आहेस. खाली उतरवून अरे, तुरे म्हणून तुझ्याजवळ कधीं घेणार आहेस मला ? काय बोलणार मी ! म्हटलं, ' तुम्हीं माझ्याहून मोठे आहांत ना ! '

'प्लीज गीता, असं कांहींतरी बोलून दुखवूं नकोस मला. तूं सर्व दृष्टीनं माझ्याहून मोठी आहेस. जन्मताच आईची जात आहे तुझी.

मी विचारलं,, " पराग तुझे आई–वडील,–बायको......?

" गीता या जगांत माझं कोणीं नाहीं. अगदीं एकटा. एकाकी आहे मी ! " त्याच्या डोळ्यांतला तो अनाथ भाव आणि अचानक मी म्हणालें—

" अरे पराग... आणि मी ! मी कोणीच नाहीं वाटतं ! "

**ज्योत्स्ना देवधर**

पराग कांहींच बोलला नाहीं. क्षणभर एकटक माझ्याकडे पाहत राहिला. अपार कृतज्ञता. सांडत होती त्याच्या डोळ्यांतून.

एके दिवशीं काम आटोपून दुपारची जरा विश्रांती घ्यावी म्हणून पुढल्या खोलींत आलें तो जाड पाकीट पडलेलं दिसलं. अक्षर ओळखीचं नव्हतं आणि आश्चर्य म्हणजे पाकीट माझ्या नांवाचं होतं. भरकन् फोडलं. परागचं पत्र होतं. किती गिचमिड अक्षर आहे. या परागचं 'आई......संबोधन वाचलं आणि कुणीतरी बेसावध असतांना फटका मारावा असं वाटलं. माझा, माझ्या वयाचा, माझ्या, रुपाचा अपमान होता हा. परागनं मला ' आई ' कां म्हणून लिहावं. रागानंच पत्र वाचायला सुरवात केली. पत्र खूप मोठं होतं. भावनेनं ओथंबलेलं आणि अत्यंत जिव्हाळ्यानं लिहिलेलं त्यांत होता समर्पणाचा स्वर. माझ्याविषयीं त्याच्या भावना वाचताना विलक्षण असा अनुभव येत होता मला. त्याची आई म्हणे अगदीं माझ्यासारखी दिसायची. मला पाहिल्यापासून माझी ओळख व्हावी; म्हणून तो एकाकी मुलगा धडपडत होता आणि शेवटीं त्यानं लिहिलं होतं, 'आई, तुझ्यापासून दूर तुझा हा मुलगा तुझ्या स्नेहावर जगून आहे. आई, मला फार फार वाटे, माझी काळजी घेणारं, माझी चिन्ता वाहणारं कुणीतरी असावं आणि, त्या दिवशीं









अनुक्रमणिका

बरसल्या संध्याकाळीं टॉवेल देतांना झालेला तुझा तो स्नेहिल स्पर्श, आणि वात्सल्यानं ओसंडणारे तुझे ते डोळे ! आई, माझ्या हाकेला तुझी ओ मिळाली, तुझ्या पत्राकडे डोळे लावून बसलों आहे.

त्याच्या शब्दांत विलक्षण अशी ओढ होती. पत्र वाचून संपलं आणि माझ्या नकळत मी माझ्यापेक्षां वडील अशा मुलाची मनोमन आई झालें.

हे ऑफिसमधून घरीं आले. त्यांच्या हातांत पत्र ठेवत मी म्हणालें, ' परागचं पत्र आलंय.'

' पराग ?'

' अहा असं काय करतां, परागला विसरलांत ? '

' अं–हो. तो पराग-होय ! काय म्हणतोय. '

' पत्र वाचा कीं, ' मी म्हणालें.

पण तें गिचमिड अक्षर पाहून कीं काय कुणास ठाऊक. पत्र न वाचताच माझ्या हातांत देत हे म्हणाले, खुशाल आहे ना ? कुठे असतो हल्लीं ?'

' त्याची एकाएकी बदली झाली आणि रातोरात कंपनीच्या गाडीनं तो नागपूरला निघून गेला. आजारी होता. आतां बरा आहे.' मी म्हणाले.

' हो का ? बरं. हे बघ गीता त्याला पत्र पाठवून दे लगेच. ' हे म्हणाले.

मी हातांत पत्र घेऊन ह्यांच्याकडे पाहतच राह्यले. विचारायचं तरी एवढी सात–आठ पानं हेंच लिहिलंय–बदली झाली, आजारी होता, आता बरा आहे......पण छे......

माझा आणि परागचा पत्रव्यवहार वाढत गेला. ह्यांना पत्र दाखवायचं सोडून दिलं मी. ह्यांनीं त्यात कधींच लक्ष घातलं नांहीं.

एक दिवस मोठंसं पाकीट पोस्टमन टाकून गेला. काय असेल बरं म्हणून उघडतें तो आत माझं चित्र. ऑईल पेंट खाली लिहलं होतं—' आत्माशिनी ' मी चकितच झालें परागचा आणखी एक पैलू दिसला होता. त्या चित्राकडे पाहून वाटलं, खरंच आपण असा दिसतो ! वात्सल्याचा एक मधुर भाव होता त्या चेहऱ्यावर. वाटलं, हा भाव परागच्या मनातला आहे, माझ्या चेहऱ्यावर इतका गोडवा नक्कीच नाहीं.

हे घरीं आल्यावर मी मुद्दामच म्हटलं.

' आज मी खूप खूप आनंदात आहे. कुणीतरी कांहीतरी पाठवलंय मला. '

' हो ! तुझं काय बुवा. तुला कुणीहि पाठवील. दाखव तरी काय आहे तें. '

मी ते जड पाकीट त्यांच्यासमोर धरलं.

' परागनं कांहीतरी खास पाठवलेलं दिसतंय. ' हे हंसत म्हणाले.

' बघा तरी उघडून '

' छान काढलं आहे हे तुझं चित्र. आपण फ्रेम करून हॉलमध्ये लावूं या. असं म्हणून त्यांनीं ते पाकीट माझ्या हातांत दिलं आणि बाथरूम मध्ये निघून गेले.

हं, म्हणे फ्रेम करूं. ह्यांना परागचा राग कसा आला नाहीं. माझ्या आनंदाचा हेवा कसा वाटला नाहीं !

टॉवेलनं तोंड पुसतां पुसतां म्हणाले, ' हे बघ गीता, त्याला पत्र लिही, म्हणावं आठ पंधरा दिवस पुण्याला ये. आरामांत राहा. जरा चेंज होईल. ' मी चहाचा कप ह्याच्या हातात दिला. कांहींच बोलले नाहींत. काय बोलणार त्यांच्या पुढें–किती सहज विश्वास आहे ह्याचा माझ्यावर ! पण जग ? शेजार पाजारचे ?

' खरंच बोलवूं का त्याला आपल्या घरीं, ?' मी विचारलं.

' म्हणजे काय ! जरूर बोलव. '

असला आहे ह्यांचा स्वभाव.

पण मी विचार करतच राह्यलें. हो, पुरुषांना काय ! सारा दिवस बाहेर राह्यचं. टीकेला तोंड द्यायला लागेल मला. पण दुसऱ्याच दिवशीं परागचं पत्र आलं. अत्यंत उद्वेगानं भरलेलं प्रत्येक शब्द कोमेजलेला सुकलेला. मी त्याला लगेच पत्र लिहलं–पुण्याला निघून ये.

त्यानं लिहलं होतं–आई, तुला माझ्या दुर्दैवाची आणखी एक कथा सांगतो, वात्सल्याचा ठाव तुझ्या डोळ्यांत पाह्यला आणि मी तुझ्या पायाशी येऊन बसलों. तसंच माझं हें तरुण मन एका मुलीच्या प्रेमात तिच्या चरणीं विसावलं होतं. तिचं माझ्यावर प्रेम होतं असं आज कसं म्हणूं ! आई, तिनं मला दगा दिला ती एका श्रीमंताची राणी झाली. तुम्हीं बायका इतक्या निष्ठूर असतां कां ग. मी जन्मभर असा एकटा, एकाकीच राहणार का ? आई, या जगांत एकहि जागा अशी नाहीं का ग, कीं तिथं क्षणभर माझं हे शिणलेलं डोकं टेकूं शकेन ?

मी पत्र लिहलं, पोस्टांत टाकलं आणि विचारांनीं उचल खाल्ली. या तरुण मुलाला मी जवळ घेऊं शकेन का. माझ्या पदरानं त्याचे डोळे पुसूं शकेन का ! विचित्र विवशता होती माझ्या मनात. माझं मन एका अननुभूत प्रसव पीडेनं भरून आलं होतं. मी मानस पुत्राला जन्म देत होते. हा वेदना, ही कळ शारीरिक नव्हती, मानसिक होती. माझं मन एका नवीन नात्याला जन्म देत होतं. विचित्र अवस्था झाली होती माझी. दोन मुलांना जन्म देऊनहि आज मी पहिलटकरणीसारखी व्याकुळ झालें होतें. आज मातृत्वाचा अर्थ नव्यानं मला कळत होता. वाटलं, मातृत्व किती व्यापक आहे ! किती उदात्त आहे ! एका तरुण मुलाच्या आगमनामुळं माझ्या दोन मुलांच्या हक्कात कुठेंच उणं पडलं नव्हतं. जर...जर हा पराग प्रियकर म्हणून माझ्या आयुष्यात येता...तर...तर ! पत्नीचं नातं किती संकुचित आहे. तिथं दुसऱ्याला जागा नाहीं. आणि जग ? त्याला हे नातं पेलेल का ? वाटलं, जग किती लहान आहे, किती दुबळं आहे.

आणि पराग आला ह्यांनीं त्याचं अत्यंत प्रेमानं स्वागत केलं. दोन्ही मुलं त्याच्या हाताला झोंबलीं. मी दाराच्या चौकटींत उभं राहून त्याला आशिर्वाद देत होतें...मनोमन...फक्त डोळ्यावाटे...

माहित नाहीं, योगायोग कीं जाणूनबुजून, दुसऱ्या दिवशीं ऑफिसमधून येतांच हे म्हणाले—

' बरं झालं,पराग तुम्हीं आलांत. मी ऑफिसच्या कामानिमित्त आठ दिवस बाहेर जातो आहे. '






‘ कुठें जाणार आहांत ? एकाएकीं कसं ठरलं ? ’ मी मध्येंच विचारलं.

‘ हे पहा दादा, लवकर यायचं हं. ’ पराग म्हणाला.

‘ च् काय विचित्र आहांत तुम्हीं दोघं. पराग गीताकडे नीट लक्ष ठेवायचं हं. मी बाहेरगांवी गेलों कीं ही धड जेवतसुद्धां नाहीं. तुमच्यावर जबाबदारी आहे. मी परत आल्यावर गीता वाळलेली दिसली तर शिक्षा भोगावी लागेल. ’

‘ दादा तुम्हीं कांहीं काळजी करूं नका. आणि गीताताई सुधारली तर बक्षीस काय देणार ? ’ परागनं विचारलं.

‘ वा, बक्षीस जरूर मिळेल...एक छानशी बायको...’ आणि हे मोकळेपणानं हंसले.

असला आहे ह्यांचा स्वभाव.

हे गांवाला गेले. पराग सारा दिवस माझ्याभोंवतीं एखाद्या लहान मुलासारखा घुटमळत असायचा. बऱ्याच वेळां मला अवघडल्यासारखं होई. त्याच्या तें लक्षांत येई आणि तो म्हणे, “ गीता तुला वाटत असेल, असं काय करतो हा. साधं ‘ धोरण ’ कसं नाहीं याला. पण खरं सांगू ! मला असलं हे घरगुती आयुष्य कधींच लाभलं नाहीं. स्त्रीचा स्नेह कधींच मिळाला नाहीं. ’ एके दिवशीं रात्रीं जेवणं आटोपली होती. दोन्हीं मुलं झोपलीं होती, आम्हीं दोघं गच्चीवर चांदण्यात गप्पा मारत बसलों होतों. नकळत त्यानं त्याची प्रेमभंगाची कहाणी मला सांगितली. तो बोलत होता. कळवळून बोलत होता आणि पीळ पडत होता माझ्या पोटांत...त्यांची नजर खिळली होती चंद्रावर.

‘ खरंच गीता स्त्रीजातीवरचा विश्वास उडावा अशी वागली ती...पण तूं, तुझं वागणं...गीता तूं किती प्रेमळ आहेस...आं, तूं रडते आहेस. माझ्यासाठीं तूं रडते आहेस...गीता माझी गीता... ’ आणि त्यानं माझ्या मांडीत डोकं खुपसलं. मी त्याच्या पाठीवरून हात फिरवला आणि त्याच्या कुरळ्या केसातून माझी बोटं फिरूं लागली. तोंच पटकन मान वर करून परागनं माझ्या कंठभागाचं चुंबन घेतलं. मला एकदम कससंच वाटलं. मी त्याला एकदम दूर लोटलं आणि पळतच माझ्या खोलींत येऊन दार लावून घेतलं.

सकाळीं उठलें. रात्री नीटशी झोप लागली नव्हती. खूप रडलें होतें मी. फार वाईट वाटलं होतं मला. पण माझं मलाच कळेना कीं माझं चुकलं होतं कीं परागचं चुकलं होतं.

खालीं आलें तो पराग सामान बांधून माझी वाट पाहत होता. त्याच्या चेहऱ्यावरच्या त्या शिणरेखा पुसल्या गेल्या होत्या. आजाऱ्यासारखा दिसत होतो.

‘ मी जातो आहे. ’ तो म्हणाला.

‘ कां ’

‘ उगाच ’

‘ हे येईपर्यंत थांब ना. ’

‘ अं. हं. ’

‘ कां, एका रात्रींत इतकी परकी झालें मी ? ’

‘ तूंच केलंस परकं मला. तूं ओळखलं नाहींस मला गीता. ’ मी कांहींच बोललें नाहीं. त्यानं जाऊं नये असं वाटत होतं मला. पण वाटणं निराळं आणि तसं बोलून दाखवणं निराळं नाहीं कां !

तो निघून गेला. दोन दिवसांनीं हे आले आणि येतांच त्यांनी परागची चौकशी केली. मी जरा रागानंच म्हणाले, ‘ गेला निघून, त्याला बांधून ठेवायला तो काय आपल्या नात्यागोत्यांतला आहे ? ’

कांहींतरी बिनसलं आहे याची कल्पना आली ह्यांना. मला पण राहवलं नाहीं. सारं सारं सांगून टाकलं. ‘ वेडी आहेस, अग ज्याला मनोमन मुलगा मानलास त्याच्या एका स्पर्शाला एवढी घाबरलीस ! गीता, वैवाहिक पावित्र्याला फार किंमत आहे. अग, रक्ताची नातीं हक्कानं टिकूं पाहातात. मानसिक नातं टिकवणं हे तुझ्यासारख्या स्त्रीलाच शक्य आहे. तोंच तुझा खरा स्वभाव आहे. आपल्या संजयनं तुझ्या कंठ भागाचं चुंबन घेतलं असतं तर त्याला झिडकारलं नसतंस ना. उगाच दुखावलंस त्याला ’ हे म्हणाले. आणि त्याच दिवशी त्यांनीं स्वतः त्याला-पत्र लिहिलं ‘ मी आलों आहे– तुम्हां आई लेकाचं–भांडण मिटवायला. पत्र वाचताच निघून ये.’

असला आहे ह्यांचा स्वभाव !

●●●










# प्रवास माझ्या गोमंतकाचा

गोपाल कृष्ण भोबे

अकरा वर्षांच्या कालावधिनंतर माझ्या मुक्तजन्मभूमीचें मीं दर्शन घेतलें. कृतार्थ झालों. गेल्या अकरा वर्षांत मी तिथल्या बारेमाप गोष्टी ऐकत होतों. जें ऐकत होतों त्यामुळें असें वाटत होतें कीं मीं पहिलेल्या गोमंतकाचा आणि आतां पाहणार असलेल्याचा पूर्णपणें कायापालट झालेला असेल !

अनेक स्नेह्यांसोबत्यांच्या तोंडून ऐकलेल्या 'लाखांच्या' गोष्टीचा लखलखाट दृष्टीसमोर नाचत होता. गेल्या अकरा वर्षांत मला भेटलेली तिथलीं माणसें शेंकड्यांवर बोलत नव्हतीं; हजारांवर बोलत नव्हतीं, (लाख बोलत नसलीं तरी) लाखांवर बोलत होतीं. एका गृहस्थाच्या संपत्तीच्या वाटण्या त्याच्या चार मुलांत झाल्या; तर एकेका मुलाच्या वांट्याला दहा नव्हे–वीस नव्हे तर–साठ–साठ लाख रुपये आले होते. कुणीहि उठावें, माती हातांत धरावी त्याचें सोनें होत होतें. कालचा अतिसामान्य माणूस केवळ डोंगर पोखरून आज गजांत लक्ष्मीचा मालक झाला होता. 'लंकेत सोन्याच्या विटा' अशी एक म्हण आम्ही ऐकत होतो, पण ही म्हण केवळ पुराणांतली नव्हती–ती थोडीशी बदलून लंकेच्या ऐवजीं 'गोव्यांत' असा शब्द घातल्यानें खऱ्या अर्थानें पुरी होणारी होती. (मध्यंतरीच्या काळांत गोव्यांतून भारतांत येणारें जकात अधिकाऱ्यांनीं पकडलेलें कोट्यावधि रुपयांचें सोनें वाचकांच्या आठवणींत असेलच !)

आतां जांवयांना मिळणाऱ्या हुंड्याची गोष्टच घ्या. जांवयी डॉक्टर असला तर दीड लाख रुपयांपर्यंत हुंडा (शिवाय मान-पान करणी हीं वेगळींच) इंजिनिअर असला तर एक लाख (मानपान हें पुन्हां एकदां वाचणें) चांगल्या नोकरीच्या असला (म्हणजे 'बर्माशेल' वगैरे वगैरे) तर अर्धा लाख, अशी वर्गवारी केली जात होती. अंमलांतही आल्याच्या अनेक गोष्टी आहेत. जावयांवरून मोटारीकडे वळूं. आमच्या लहानशा गांवांत जेवढीं घरें आहेत तेवढ्याच काळ्याशार करकरीत मोटारी पांखरांसारख्या भिरभिरत होत्या. चार पांच वर्षांपूर्वीं गोव्याच्या गव्हर्नरांनीं तिथें जाऊन, तें एक आदर्श खेडें व्हावें म्हणून, अनेक संकल्प सोडलेलें होतें. डांबरी सडका–मुलांना खेळायला : सुंदर बाग–प्रौढांना सहलीला बगीचा–सारांश तें तें एक टुमदार खेडें व्हावें असे प्रयत्न होणार होते असेंहि ऐकलें होते; किंबहुना रस्ते दुरुस्तीसाठीं जें अंदाजपत्रक सादर केलें गेलें त्याला अनुसरून गव्हर्नरानी ती रक्कम घेतल्याचेंहि दोन वर्षांपूर्वीं कळलें होतें. गव्हर्नरांच्या संकल्पांतलें अर्धें तरी पूर्ण झालेलें असावें अशी माझी कल्पना होती. खटारगाड्यांचें आणि धमन्यांचें तें खेडें आतां मला शहरवजा दिसणार होतें.

अमुक एक गोष्ट करणें हें पाप आहे अशी आम्हांला लहानपणापासून शिकवण. (दारू प्यायलों तर शिश्याचा तप्त रस वृषपर्वा घशांत ओतील किंवा 'ज्यानें पहिला एकच प्याला घेतला त्यानें हा असा शेवटचा घेतलाच पाहिजे' या सुधाकराच्या उद्गारांच्या भयाने आम्हीं चुकून दारूला शिवलों नाहीं. पण गेल्या वर्षी 'शामा शेणै'



अनुक्रमणिका

माझ्याकडे आला आणि त्यानें चारचौघांत 'टिंटो' 'सेवेंज' 'मासियैर' 'पोर्तु' या बालीश आणि 'पांढरा घोडा' 'काळा-पांढरा' 'स्कॉच' 'कॉस्तांतीनु' 'शांपॅन' इत्यादि प्रौढ दारूचीं जीं रसभरीत वर्णनें माझ्याकडे केली, त्यांची चव न घेतल्या बद्दल मला दोष दिला, त्यामुळें मी फार हळहळलों होतों. आजच्या तिथल्या व्यापारी सृष्टींत हें पिणें म्हणजे इभ्रतीचें समजतात असेंहि तो म्हणाला होता. म्हणजे आमच्या वेळीं जें पाप होतें तें थोड्याशा अर्थानें आज पुण्य समजलें जात होतें; परंतु पाप पुण्याची कल्पना ही माझ्या काळांतल्या तरुणांना होती त्याचें कारणहि उघड होतें. त्यावेळीं व्यापार रुपये आणे पै या हिशोबांत चालत होता; आतांचा व्यापार सोन्याच्या नाण्यांनी चालत होता. पापाचें भय तत्कालिन दुर्बळांना होतें, आजच्या सबळांना नव्हतें. आणि नुसती डोंगरांतली माती विकल्यानें हजारों लाखों रुपयांची क़माई होते हें तरी वीस वर्षांपूर्वी कुणा गोमंतकीयाला कुठें माहिती होतें ? असो ! तर काय सांगत होतों--

अशा सर्व भव्य दिव्य कल्पनांचा झगझगाट डोळ्यांसमोर तरळवित मी गोव्यांत जायला निघालों. आमचे परम मित्र रामकृष्णपंत नायक यांनी मुक्ति सैनिकांबरोबर जाऊन सबंध गोव्याचा प्रवास केला होता. त्यांनी सांगितलेलीं तिथलीं वर्णनें ऐकून तर पक्वान्नाचें वर्णन ऐकून जिभेला लाळ सुटावी तशी मनाला लाळ सुटली होती. केव्हां एकदां जाऊन मायदेशाचें दर्शन घेतां असें झालें होतें. मुंबईहून गोव्यांत जायचे जेवढे म्हणून मार्ग होते तेवढेहि-सुरूंग वगैरे काढून निर्धोक झाल्यानें-खुले असल्यानें व गोमंतकीयाला गोव्यांत जायला मज्जाव नसल्यानें 'कमी सामान सुखदायक प्रवास' हा रेल्वे खात्याचा पोक्त उपदेश लक्षांत घेऊन-एक लहानशी बॅग घेऊन-मोकळ्या मनानें बोरीबंदरच्या तिकिट-घराकडे जाऊन शक्य तेवढ्या नम्रतेने मी म्हटलें-

'एक तिकिट मडगांव गोवा !'

'लोंढ्या पर्यंत तिकिट मिळेल !' नुकतंच भांडण करून गंभीर बनलेल्या शेजाऱ्यासारखा, माझ्याकडे ढुंकूनहि न पहातां तो तिकिट विक्रेता गुरगुरला.

'आणि मग पुढचं कसं काय ?' पुन्हां मी त्याच नम्रतेनें म्हणालों.

'तें लोंढ्याला गेल्यानंतर कळेल !' फिरून गुरगुरणें आलें.

रेल्वेची, बसचीं किंवा अन्य वाहातुकीच्या साधनांचीं तिकिटें विकणारीं जीं माणसें




कॅसलरॉकला सारें संशयी वातावरण !

असतात तीं अशी सदा कावलेलीं, दुर्मुखलेली कां असतात कोण जाणें ! अखेर नागरीकांना असणाऱ्या हक्काच्या जाणिवेने थोडेंसें जोरकसपणें विचारलें तेव्हां सरळ माहिती मिळाली-नव्हे दुसऱ्या एका माणसानें येऊन दिली. तीहि अर्धवट. पुण्यापर्यंतच प्रवास ठीक होता. पुण्याच्या मोठ्या स्थानकावरून जिथून सदर्न रेल्वे निघते. त्या स्थानकावर आलों. बंगलोरकडे निघणाऱ्या गाडीला फक्त पस्तीस मिनिटें अवकाश होता; तोपर्यंत कांही गाडी स्थानकांत आली नव्हती. स्थानकावर अशी गर्दी होती कीं जणूं या बाजूला कुठें आकांत झाल्यानें माणसें आपापल्या गावाला पळून जात होतीं; पण असेना का गर्दी; ती असली म्हणून काय झालें ! आपले 'सेकंड क्लासचें' तिकिट आहे-असें मनांत म्हणून, आपण कुणीतरी वेगळे असल्याच्या जाणीवेनें गाडीची वाट बघत बाजूला उभा राहिलों. इतक्यांत भक् भक् करीत गाडी आली. पंजाब मेल मनमाडहून नाशिकला येते तशी भरून आली. सर्व गाडीभर लोक अस्ताव्यस्त झोपले होते,

चौकशीअंतीं असें समजलें कीं गाडी 'शेड-मध्यें' असतानाच बरेचसे लोक तिथें जाऊन जागा अडवतात. आणि दोन पांच रुपये घेऊन गरजू माणसाला तीं देतात. कित्येक वर्षें हें असेंच चाललें आहे. रेल्वे कंपनी कांहीं तिथें लक्ष देत नाहीं. पण न देईना कां ! आपल्याला कशाला नसत्या चांभार चौकशा आणि चिंता ? आपला 'सेकंड-क्लास' आहे. बॅग घेऊन मीं सेकंड क्लासचा डबा शोधित निघालों. पहिला वर्ग आधींपासून सुरक्षित असल्यामुळें तिकडे पाहायचें कारण नव्हतें. १०×१० चा एक सेकंडक्लासचा डबा होता. तो माणसांनीं आणि सामानाने असा खच्चून भरला होता, कीं त्यांत मुंगीलाहि रिघाव मिळणार नाहीं अशी गर्दी होती. शिवाय आणखी माणसें आणून 'चढा तुम्ही काळजी नका करूं. मी हायेच मागें. हां चढा चढा' असें म्हणत नवा माणूस आंत कोंबून हमाल त्याच्याकडून 'एवढी तुम्हांला जगा मिळवून दिली' म्हणून दोन तीन रुपये उकळत होते. तो डबा बघूनच मला कांपरें भरलें. लोंढ्यापर्यंत या डब्यांतून प्रवास करणें म्हणजे एक मोठें दिव्य होतें. मीं चेकरकडे तक्रार केली. पंधरा वीस माणसांना बसायचा एकच डबा असतांना तुम्हीं साठ सत्तर तिकिटें कां विकतां ? म्हणून प्रवासी हक्कानें विचारलें, 'थांबा हं, तुमची व्यवस्था करतो' असें माझ्या छातीवर हात ठेवून आश्वासन देऊन-या रहाटगाड्यांत रोज मुरलेला असा तो चतुर माणूस जो गेला तो लोंढ्यापर्यंत कांहीं मला दिसला नाहीं. मी तिसऱ्या वर्गाचा एक एक डबा पहात चाललों होतों. प्रत्येक डब्यांत माणसांचें लोणचें घातलें होतें. कशी बशी मी बसण्यापुरती जागा मिळविली आणि एक वाजून पंचावन्न मिनिटांनी गाडी एकदांची हलली.

मीं लोंढ्याला पोंचलों तेव्हां रात्रीचा दोड वाजला होता. कडाक्याची थंडी असल्यानें दांत आपोआप चक्रतालाचे बोल वाजवित होते. कां कोण जाणे लोंढा हें स्थानक मला फार आवडतें. गाडी चुकून तिथें रात्रभर कुडकुडत राहावें लागलें तरी मला आनंद वाटतो. कुठें तरी गाडीची शिटी वाजते. 'गाडी आली, गाडी आली' असा लोकांचा गलका होतो. आणि मग ती कुठली तरी मालाची गाडी निघते. लोक पुन्हां आपल्या जागीं जाऊन पडतात. युद्धकाळांत तिथें गाड्यांची अनिश्चिति फार होती. त्यामुळें तिथें मिळणाऱ्या पुरी भाजीवर दोन







अनुक्रमणिका

दोन दिवस काढावे लागत, तरी तिथलें तें अनिश्चिततेचें; पण भंवति भंवतीच्या रम्य वनश्रीचें किर्र वातावरण मला फार आवडे. आतां तिथें व्यवस्था फार छान आहे. गोव्याला जाणारी गाडी पावणेचार वाजतां सुटणार होती. तीन वाजतां तिकिटें मिळणार होती. मधला वेळ काढायचा होता. इतक्यांत पुण्याकडे जाणाऱ्या गाडीची वाट पहात असलेला एक ओळखीच्या साहित्यिक भेटला व्यवसायानें तो बातमीदार असल्यानें खास परवाना घेऊन तो गोव्यांत जाऊन आला होता. दीड प्रावणेदोन तास वेळ काढायला एक चांगलें माणूस मला मिळालें होतें.

'आयुष्यांत पहिल्यांदाच गोव्याला जाऊन आलो मी; पण गोव्याबद्दलची जी कल्पना होती तसं गोव्यांत कांहीं नाहीं हो!' तो म्हणाला—

'तसं म्हणजे कसं?' असं मीं विचारतांच तो थोडासा कचरला; पण आम्ही समवयस्क व समव्यवसायी असल्यानें त्यानें आपला मतितार्थ थोडासा घुटमळत थोडासा अस्पष्टपणें व्यक्त केला. तो म्हणाला—

'गोमंतकीयांनी लिहिलेल्या कथा कादंबऱ्यांतून तुमच्या गोव्यासंबंधीं तो एक 'रंगलाल देश' आहे अशी आमची भलतीच समजूत झालेली; आणि तिकडे पहावं तर तसं कांहींच आढळलं नाहीं.' त्याला काय म्हणायचे होते हें मी समजलों होतों. मी मुद्दाम खवचटपणें म्हटलें—

'तुम्हीं तसा खोल तपास केला असता तर तुम्हाला हवं तें तिथं आढळलं असतं.' त्यावर तो म्हणाला 'त्यांत काय विशेष? तसा खोल तपास केला तर सर्व जगांत जें आढळतं तें तिथंहि आढळेल!' मी त्याला उत्तर दिलें नाहीं. फक्त खिपण्णपणें हांसलों; पण त्याचा तरी बिचाऱ्याचा काय दोष होता! गोमंतकांतल्या कांहीं मान्यवर लेखकांनीं आपल्या-लोकमान्य कथाकादंबऱ्यांतून--पुराणांतील स्त्रीराज्याप्रमाणें तें देवदासींनीं गजबजलेलें राज्य असून सर्व शारीरिक भुका तिथें तृप्त होतात अशी प्रसिद्धि केली. या अशा प्रसिद्धीमुळें कांहीं वर्षांपूर्वी सहज मुशाफरीला म्हणून तिथें गेलेल्या एका प्रथितयश साहित्यिकानें दिसेल त्या बाईला डोळे मिचकवायला सुरुवात केली, त्याच्या तिथल्याच एका मित्रानें त्याला वेळींच सावध केल्यानें पुढें होणारा प्रसंग टळला आणि तो सुखरूप परत आला ही गोष्ट वेगळी.

वास्तविक मीन, मदिरा आणि मदिराक्षींचा तो प्रदेश आहे अशी जरी अतिशयोक्तीची समजूत पसरविलेली असली तरी वस्तुस्थिति तशी नव्हती. कामांध माणसाला सर्व जगच कामुक दिसतें किंवा दुष्ट वृत्तीच्या माणसाला सारीं माणसें दुष्ट वाटावीं त्यापैकींच हा प्रकार होता. अरबस्थानांत खजूर, काश्मिरला सफरचंदें, काबुलला द्राक्षें, कोकणांत जसे आंबे तसेंच गोव्यांत वेश्यांचे घड लागलेले असतात अशीहि कित्येकांची



मला भेटलेला पत्रकार मित्र

समजूत आहे. गोमंतक स्वतंत्र झाल्यानंतर कित्येक नियतकालिकांतून 'आतां गोव्यांत ती गंमत उरणार नाहीं!' किंवा 'गोव्यातलें गोवेंपण गेलें!' असे दीर्घ उसासे सोडले गेले. जणूं 'मॉनेको' नांवाच्या केवळ जुगाराचा व वेश्याव्यवसायाचा मुख्य धंदा करणाऱ्या राज्यासारखें तें एक राज्य आहे अशा अपसमजानें गोमंतकाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर एका अत्युत्साहि लेखकानें –'आतां गोव्यांतली वेश्या भारतांतून येणाऱ्या श्रीमंत यजमानाच्या स्वागतासाठीं सज्ज होऊन राहील' असें लिहायला कमी केलें नाहीं, छे, छे! हिंदुस्थानांतल्या किंवा जगांतल्या लहानमोठ्या शहरांत–शहरवजा गांवांत कुंटणखाने आणि वेश्यागारें अगणित असतील पण यात्राबतींत अशापैकीं कांहींहि नसतांना मराठी वाङ्मयांत गोव्याबद्दल जी बदनामी झालेली आहे. त्याला जगांतल्या अन्य नाक्यांत तोड नसावी. असो! हें विषयांतर झालें आतां मुख्य मुद्द्याकडे वळूं.

माझ्या त्या साहित्यिक मित्राकडे बोलतां बोलतां दीड तास सहज निघून गेला. तशा त्या थंडींत कुडकुडत पुढच्या तिकिटासाठीं रांगेंत उभें राहावें लागलें. इथून फक्त कॅसलरॉकपर्यंतच तिकिटें मिळत होतीं. तिकिट हातांत मिळून गाडींत जाऊन बसेपर्यंत जिवांत जीव नव्हता. आपल्या देशांत विशेषतः स्थानकावर—सुदैवानें—हातोहात सामान लांबवणाऱ्यांना तोटा नाहीं. एक डोळा सामानावर व दुसरा आपल्यापुढील सरकणाऱ्या रांगेवर ठेवून एकदांचें तें लिहून दिलेलें, पावतीवजा तिकिट घेतलें, आणि गोव्यांत जाणाऱ्या गाडीकडे आलों. वाटलें–पुढचा गोव्यापर्यंतचा प्रवास तरी सुखाचा होईल. नुकतीच ही गाडी सुरू झालेली आहे. अजून सर्व लोकांना कुठें माहिती झालेली आहे; पण मींच तेवढा एक शहाणा नव्हतों. अनेक 'मारीया' आणि 'बस्त्यांव फर्नांडीसांनाहि' ही गोष्ट केव्हांपासूनची ज्ञात होती. सुरुंगांत दारू ठासून भरावी तशीं माणसें या लहानशा झ्युक झ्युक-गाडींतल्या सर्व वर्गांत भरलीं होतीं. मिणमिणत्या प्रकाशांत पेंगत होती.

आतां काय प्रवास थोडाच उरला होता. कुणीतरी म्हणालें 'गाडी कुठेंहि न थांबतां सरळ जाते.' आणि जागरणाची दीर्घ जांभई देत पुढें म्हणाले 'इट् विल् टेक् वन्ली, वन एण्ड आफ अवर' म्हणजे सहा वाजायच्या आंत मीं मडगांवला पोंहोंचणार होतो. गोमंतक भारतांत विलीन झाल्यामुळें पूर्वीसारखी कॅसलरॉकला उगाचच अडीच तास आणि 'कुळें' येथें कस्टमचे अधिकारी अंथरूणावरून उठले नाहींत म्हणून तीन तास, गाडी थांबणार नव्हती. गाडींत जागा नसली तरी उभें राहून जायलाहि हरकत नव्हती, पण... हर हर! पांच वाजतां कॅसल रॉकला आलेली गाडी तिथून साडेआठला सुटली.

हें कॅसल रॉकचें जकात नाकें म्हणजे हृदयांत धडकी भरवणारें नाकें आहे. इथें सारें संशयी नजरांचें वातावरण. असें वातावरण एखाद्या अमेरिकन रहस्यमय चित्रपटांत आढळतें. हमालापासून अधिकाऱ्यांपर्यंत इथले

सगळे लोक आपल्याकडे काळजाचा ठाव घेणाऱ्या नजरेनें पाहातात. गोमंतक भारतांत विलीन व्हायच्या आधीं तिकडून भारतांत येतांना ही गोष्ट ठीक होती. कारण त्या काळांत लोक नाना तऱ्हेचा परदेशी माल जकात चुकवून आणायचे. कांहीं चलाख लोक गुह्येंद्रियांत लपवून सोनें आणायचे म्हणे ! मग त्यांना ओकारीचीं, जुलाबाचीं औषधें देऊन तेथील अधिकारी वर्ग हें सोनें पकडायचे म्हणे !......हरि ! हरि ! देवा वांचव रे बाबा......पोट जाळण्यासाठीं अशा रीतीनें सोनें आणणाऱ्या माणसांचा कोण हा अघोरी मार्ग.

एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवण्यासारखी. इथला जो अधिकारी वर्ग आहे. तो बराचसा कडक व स्वतःच्याच मस्तींत गर्क असलेला असा आहे. एखाद्या गुन्हेगाराला तुरुंगांतून सोडावें तसें माणसांना इथून गोव्यांत किंवा भारतांत सोडण्यांत येतें. ब्रिटिशांनीं हिंदुस्थानला स्वातंत्र्य देतांना हा कॅसलरॉक तेवढा आपल्या स्वाधीन ठेवला असावा असें वाटतें. गेल्या युद्धकाळांत जी संशयी परिस्थिति होती तीच तिथें अजून असल्याचें पाहून नवल वाटलें. दाखले दाखविणें झालें. जोखमींच्या सामानाची चौकशी झाली. सर्व सोपस्कार होऊन पुढें अर्डाच तास गाडी कां खोळंबून राहिलें कळलें नाहीं. शेवटीं एकदांची ती सुटली. वाटेत मला उगाचच भीति वाटत होती. पुर्तुगेजांनी पेरून ठेवलेल्या एखाद्या सुरुंगाचा स्फोट तर बोगद्यांत होणार नाहीं ना !...गाडी बोगद्यांत शिरली तेव्हां हें काहूर विनाकारण वाढलें, पण सर्व बोगदे पार करून एकदांची गाडी दूधसागर येथें आली आणि महादेवाच्या जटेंतून वाहाणाऱ्या गंगेसारख्या —धवल तुषार उधळीत स्वातंत्र्याच्या मंगल स्तोत्राची ऋचा मध्य सप्तकांत सतत गात असलेल्या—महन्मंगल दूधसागराचें दर्शन मला घडलें. आतांपर्यंतचा शीण मी विसरलों. विराटाच्या त्या दर्शनानें मनांत उद्भवलेल्या सर्व विकारांचा विसर पडला. सृष्टिदेवतेनें आपल्या अंगावर घातलेला तो सुंदर अलंकार पाहातांना कवि बोरकरांची एक ओळ आठवली.

‘ जोड आपुली घेऊनि आला उपमन्यू बालक
माउली उपमन्यू बालक
दुग्धाचा अभिषेक करितले, मूर्तिमंत कौतुक ’

...आणि नकळत माझे हात जुळले !...

( लेखांक पहिला ) • • •

कलाकृतींच्या जन्मकथा : ६



# अश्रूंतून जन्मलेली कलाकृति

येशू ख्रिस्ताच्या जन्माआधीं एक देवांगना जगाला भविष्यवाणी ऐकवत आहे असा या कलाकृतीचा विषय आहे. या देवांगनेच्या नजरेंतून आणि बसण्याच्या एकंदर झोंकांतून केवढा आत्मविश्वास प्रगट होत आहे ! भविष्याचा खलिता उलगडून ती त्यांतील शुभकथन जाहीर करीत आहे कीं–‘ आतां असें मूल जन्माला येईल कीं ज्याच्या कार्यामुळें जगाला शांतीचा लाभ घडेल ’ आपल्या भविष्यवाणीवर तिचा पूर्ण विश्वास आहे आणि पुढें ख्रिस्तावतारामुळें होणाऱ्या स्थित्यंतराची तिला पूर्ण कल्पना आहे.

सिस्टन चॅपलमधल्या पटईवर काढलेल्या चित्रापैकीं हें एक चित्र आहे. जगांतल्या सर्वोत्कृष्ट भित्तिचित्रांत या कलाकृतीची गणना केली जाते. किंबहुना चॅपलमधल्या चित्राची बरोबरी करूं शकतील अशी चित्रें जगांतल्या इतर कुठल्याही ख्रिस्ती देवळांत नाहींत. सिस्टन चॅपलची कलासंपदा जगाच्या इतिहासांत अद्भुत आणि अवर्णनीय आहे. ही सर्व चित्रें ख्रिस्त जन्मापूर्वींचा जगाचा इतिहास सांगणारीं आहेत आणि ख्रिस्त जन्माच्या भावी साक्षात्काराची प्रचिती त्या चित्रकृतींतून प्रगट झाली आहे.

पण या अद्भुत कलाकृतीची जन्माची कथा मात्र कारुण्यानें भरलेली आहे. १६ व्या शतकांत होऊन गेलेला मायकेल अँजेलो हा थोर कलावंत या कलाकृतींचा जन्मदाता होय. मायकेल अँजेलो स्वतःला शिल्पकार म्हणवून घेत असे. चित्रकाराचें काम करण्याची त्याची मुळींच इच्छा नव्हती. सिस्टन चॅपलमधील या देवांगनेच्या चित्रांत सुद्धां त्याची शिल्पकलेची आवड प्रगट झाली आहे. एखाद्या पुतळ्याप्रमाणेंच या चित्रांतील आकृतीची मांडणी आहे. शिल्पकलेच्या जन्मजात आवडीमुळें सिस्टन चॅपलमधील हीं चित्रें तयार करणें ही मायकेल अँजेलोला एक मोठी शिक्षाच वाटली होती. पण असें वाटत असूनहि अँजेलोनें या चित्रांसाठीं घेतलेले कष्ट पाहिले म्हणजे ‘तो हृदयाचा खरा कलावंत होता ’ याची साक्ष पटते.

आयुष्याच्या पूर्वार्धांत शिल्पकार म्हणून अँजेलोचें नांव फार गाजलें होतें. वयाच्या तिसाव्या वर्षी पोपने त्याला रोमला पाचारण केलें आणि पोपचे मृत्यूपूर्वी थडगें बांधून ठेवण्याची आणि त्यांतील मूर्ती खोदण्याची कामगिरी अँजेलोकडे सोपविली. अँजेलो मोठ्या उत्साहानें तयारीस लागला. पहिले सहामहिने तर थडग्यासाठीं लागणाऱ्या उत्कृष्ट संगमरवरी दगडाच्या शोधांत त्यानें घालवले. हे काम पुरें होण्याचा योग आला असता तर ताजमहाल सारखें एक आश्चर्य अँजेलोच्या हातून निर्माण झालें असतें. पण अँजेलोला दुर्दैवानें अनेक शत्रु होते. ब्रामान्टे हा त्यांपैकींच एक होता. ‘मृत्यू आधीं स्वतःचें थडगें उभारण्याची कल्पना अत्यंत अशुभ आहे ’ असें त्यानें पोपच्या मनांत भरवलें आणि अँजेलोच्या कार्यांत त्यो

घातला. पोपचा विचार फिरला. थडगें बांधण्याची कल्पना रद्द झाली. अँजेलोनें संगमरवरी दगडाच्या निवडीत खर्च केलेले सहा महिने तर वांया गेलेच पण त्यानें खरेदी केलेल्या संगमरवरी दगडाचेहि पैसे त्याला स्वतःलाच भरावे लागले.

पोपचा नाद सोडून अँजेलो फ्लारेन्सला यायला निघाला. फ्लारेन्समध्यें येऊन शिल्पकलेची सेवा करण्याचा त्यानें विचार केला, पण त्याला याबाबतींतहि यश येणार नव्हते. शिल्पकलेची प्रथम पासून ओढ असलेल्या अँजेलोला शिल्पकलेंत काम करायला संधीच सांपडूं नये असा ब्रामान्टे व त्याच्या इतर प्रतिस्पर्ध्यांचा विचार होता. म्हणून त्यांनीं एक नवी युक्ती शोधून काढली. पोपच्या आज्ञेनें एक नवे अवाढव्य काम अँजोलोच्या गळ्यांत अडकवलें. हे काम म्हणजे सिस्टेन चॅपलमधली भित्तिचित्रें काढणें ! सिस्टेन चॅपेलसारख्या अवाढव्य इमारतींतील चित्रें काढणें म्हणजे वर्षानुवर्षं रखडणें ! अँजेलोच्या दृष्टीनें ही अगदीं सक्तमजुरीचीच शिक्षा होती ! पण पोपच्या हुकमापुढें कांहीं इलाज नव्हता. हे काम स्विकारतांना अँजोलोच्या डोळ्यांतून अश्रू आले. सिस्टेन चॅपेलमधील चित्रें काढतांना त्यानें आपल्या मित्राला लिहिलेल्या पत्रांतून त्याची मनोव्यथा प्रगट झाली आहे. तो कळवळून लिहितो, ‘ अखेर शिल्पकाराला चित्रकार बनण्याची पाळी आली ’ पुढें कांहीं दिवसांनीं लिहितो, ‘ खरोखरी हे काम करण्यांत माझ्या आयुष्यांतला अमूल्य वेळ मी वांया घालवित आहे ’

सिस्टेन चॅपेलमधील चित्रें काढण्यास मायकेल अँजेलोला मदत म्हणून अनेक चित्रकार देण्यांत आले होते. मायकेल अँजोलोचे अहित चिंतणारा ब्रामान्टेहि त्याच्या मदतीला धांवून आला होता. फ्लॅरेंसमधले कांहीं वाकबगार भित्तिचित्र काढणारे त्यानें मुद्दाम अँजोलेचा पाणउतारा करण्याच्या हेतूनें आणले होते. खूप उंच अशा पटईवर काम करतां यावें म्हणून ब्रामान्टेनें अँजेलोसाठीं पहाड बांधून घेतले. ब्रामान्टेनें मदतीचा बहाणा केला तरी अँजेलोचा त्याच्यावर विश्वास नव्हता ‘ हा आपला केव्हां गळा कापील याची कल्पना नाहीं ’ असें अँजेलोला वाटूं लागलें. ब्रामान्टेनें आणलेले फ्लॅरेन्सचे चित्रकारहि केव्हां दगा देतील त्याचा नेम नव्हता. संशयानें अँजेलो त्रस्त झाला.

अखेर एक दिवस ब्रामान्टेनें बांधलेले पहाड मोडून त्यानें स्वतः पहाड बांधले आणि चॅपेलचे दार आंतून बंद करून घेतले. फ्लॉरेन्सचे चित्रकार आणि ब्रामान्टे यांनी दार ठोठावले तरी अँजेलोनें दार उघडलें नाहीं. तो म्हणाला, ‘ या पुढें मी कोणाचीही मदत घेणार नाहीं. तुम्ही आपल्या घरीं परत जा ’ आणि खरोखरीच अँजेलोनें ही प्रतिज्ञा पूर्ण करून दाखवली. भिंतीवरची चित्रें काढण्याचा अँजेलोला पूर्वानुभव नसल्यानें त्याला अनेक आपत्तींना तोंड द्यावें लागलें. एकदां तर संपूर्ण चित्र तयार झाल्यावर त्याचे पोपडे पडल्यामुळें प्रथमपासून तें चित्र पुन्हां काढावे लागले. हीं चित्रें इतक्या उंचीवर आणि अवघड जागीं काढावयाची होती कीं चित्र काढतांना तोल सुटला तर मृत्यूशींच गांठ होती ! याच काळांत पैशाच्या हलाखीमुळें सावकाराचे धरणेकरी त्याला सतत छळत. काम चालू असेपर्यंत कोणालाहि चॅपेलमध्यें पाऊल टाकूं द्यायचें नाहीं असा त्यानें निश्चय केला होता. अर्थात त्याच्या कामाची प्रगती मुळींच पहायला न मिळाल्यानें जसजसे अधिकाधिक दिवस जाऊं लागले तसतसा पोपचा ससेमिरा वाढूं लागला. एकदां तर त्यानें अँजेलोला बजावलेंच कीं, ‘ तुझ्या या आळसरपणाचा मला आतां अगदीं वीट आला आहे. याद राख. माझ्या समाधानाला तुझें काम उतरलें नाहीं तर तुला पहाडावरून खालीं ढकलून देईन ’ या साऱ्या कटकटींनी अँजेलोच्या डोळ्यांत अश्रू उभे रहात पण अश्रू ढाळत असतांनाहि त्यानें कामांत कधीं कसूर केली नाहीं. सतत दिवसरात्र चार वर्षं राबून त्यानें हे काम पुरें केलें. पटईवरची हीं चित्रें काढतांना त्याला दिवसानुदिवस उताणें पडून काम करावें लागे. जग जेव्हां झोंपलेलें असे तेव्हां मेणबत्तीच्या प्रकाशांत मध्यरात्री या चित्रकाराचे चित्रकाम चालू असे. पण या कष्टाचें सार्थक झालें.

चार वर्षाच्या अखंड परिश्रमानंतर अँजेलोनें चॅपेलचे दरवाजे उघडले आणि एक अद्वितीय कला भांडार जगाला खुलें झालें. मायकेल अँजेलोच्या त्या कला कौशल्यानें जग अक्षरशः दिपून गेलें. त्या काळचा एक थोर चित्रकार आणि अँजेलोचा प्रतिस्पर्धी रॅफेल ते काम पाहून इतका चकीत झाला कीं सारें वैर विसरून तो म्हणाला, ‘ मी केवढा भाग्यवान कीं या पिढींत जन्माला येऊन हें काम पहाण्याची संधी मला मिळाली ! ’

जगाच्या कला इतिहासांत या सिस्टेन चॅपेलमधल्या कलाकृतींनीं अँजेलोचे नांव अमर झालें खरें पण त्याच्या स्वतःच्या तब्येतीवर मात्र या चित्र कामाच्या ताणाचा वाईट परिणाम झाला. त्याचे वय चाळीशीला येऊन पोंचलें होतें त्यामुळें त्यांनी घेतलेले शारीरिक कष्ट झेपण्याजोगे नव्हते. उताणे पडून काम केल्यानें त्याच्या मानेच्या शिरा आखडल्या गेल्या. त्याच्या दृष्टीवर इतका परिणाम झाला कीं पुस्तक अगर पत्र वाचायला त्याला कैक दिवस ते डोक्यावर धरावें लागे ! मायकेल अँजेलोला जडलेल्या निद्रानाशाच्या विकाराचें मूळ या काळांतच रुजलें गेलें !

हे सर्व लक्षांत घेतलें म्हणजे बंदीशाळेंतल्या कैद्याप्रमाणें या काळांत अँजेलोने हाल भोगल्याची खात्री पटते आणि मग चित्रांतल्या या देवांगनेकडे पाहून वाटतें कीं ही देवांगना ख्रिस्तजन्माचे भविष्यकथन करीत नसून अँजेलोच्या कलाकर्तृत्वाचा गौरव करीत आहे. ती म्हणत आहे. ‘ ज्या कलावंतानें आम्हाला जन्म दिला त्याचें हाल आमच्या डोळ्यांनी आम्ही पाहिले आहेत. त्याच्या ढळणाऱ्या अश्रूंतूनच आम्ही जन्माला आलों आहोंत. रसिकांनो, हे लक्षांत ठेवा कीं खऱ्या कलावंताची प्रतिभा ही विजेसारखी अलौकिक असते. प्रतिकूल परिस्थितीच्या काळोखांत तिला गाडली तरी ती तळपल्याशिवाय रहात नाहीं. ’

•

• • •

अनुक्रमणिका

*दीपावलीचे हे एक नवे सदर या महिन्यापासून सुरू होत आहे या सदरांतून विश्वसाहित्यांतील उत्तमोत्तम निवडक लोककथा अधुनमधून देण्यांत येतील. लेखकांनी अशा तऱ्हेच्या अनेक जागतिक वाङ्मयांतील साहित्यधन पाठविल्यास दीपावलींतून त्याचा योग्य परामर्ष घेतला जाईल.*



**देशोदेशींच्या लोककथा**

# हुतात्मा कंदर्प

माणसानीं कांदे खायला केव्हां सुरुवात केली याबद्दल इतिहास संशोधकांचं कांहींहि मत असो, पण त्यापूर्वीच्या काळची गोष्ट आहे ही.

पूर्वीं जग अत्यंत रानटी स्थितींत होतं. त्यावेळीं माणूस हा प्राणी अतिशय निर्बुद्ध नि अपरिपक्व दशेंत होता. त्याच्यांत ज्याला आज आपण माणुसकी म्हणतों ती मुळींच नव्हती. आजकाल माणूस माणसाकडे ज्या दृष्टीनं पाहातो वा ज्या भावनेनं वागतो तसा प्रकार पूर्वीं त्रिलकुल नव्हता. आज माणसांना भाजी, फळफळावळ, मासे, अंडी, कोंबडीं. बकरीं इत्यादि आहाराच्या वस्तू सर्वसंमत झाल्या आहेत, पण अगदीं पूर्वीं तसं कांहीं नव्हतं. त्यावेळीं माणसं माणसांनाहि खात. ‘ जीवो जीवस्य जीवनम् ’ हेंच तत्व सरसहा जारी होतं. त्यामुळें प्राणीसृष्टींत तर राहोच, पण मानवीसृष्टींतहि फार घोंटाळे माजत. माणूस भुकेच्या आधीन झाला कीं जो समोर दिसेल त्यालाच तो गट्ट करी–मग तो माणूस आहे का दुसरा कुणी आहे याचा त्याला विधिनिषेध नसे. माणूस इतर माणसांना तर ओळखीत नसेच, पण आपल्या अगदीं जवळच्या–स्वतःच्या रक्ताच्या माणसांनाहि ओळखीत नसे- मानीत नसे--जुमानीत नसे. मुलं प्रत्यक्ष आईबापांना, भावंडं भावंडांना ओळखीत नसत. किंबहुना, माणसांना माणसं कोणतीं नि जनावरं कोणतीं हें न समजण्याइतकं ज्ञान वा सारासार बुद्धि त्यांच्या ठायीं नव्हती. आपण ज्याला रानटी अवस्था म्हणतो त्याचा अवस्थेंत माणूस होता.

आणि अशाच अवस्थेंत एकदां एका माणसाच्या हातून असाच एक प्रमाद घडून आला. भुकेच्या आहारीं जाऊन त्यानं आपल्या स्वतःच्या भावालाच खाऊन टाकला! अर्थात् आपली भूक शमवि- ल्यावरच झाला प्रकार त्याच्या लक्षांत आला. त्यांतल्यात्यांत जो बराचसा सुबुद्ध असल्यामुळं आपल्या त्या अमानुष नि रानटी कृत्याचा त्याला पश्चात्तापहि झाला. पण तो पश्चात्ताप मागून होऊन काय कामाचा होता ? एक तर त्याचा तो भाऊ जगांतून कायमचा नाहींसा झाला होता; तेव्हां पश्चात्ताप वगैरे कांहींहि करून तो आतां परत येणार नव्हता. “ छे, छे ! आपल्या हातून भयंकर वाईट गोष्ट झाली ! तशांत यापुढंहि आपण आपल्या माणसांतच राहणार, आणि जोंपर्यंत आपली अशीच रानटी वृत्ति आहे तोंपर्यंत आपल्या हातून अशीच भयंकर कृत्यं पुढंमागं घडत राहणार. तेव्हां तसं कांहीं होण्यापेक्षां आपण इथं न राहणं–त्यांच्यापासून दूर राहणंच चांगलं, असे विचार त्याच्या डोक्यांत घोळूं लागले.

मग तो तसा विचार करूनच नुसता थांबला नाहीं. तर जिथं माणूस माणसाप्रमाणंच वागतो–माणूस ही माणसाची खाद्यवस्तू नाहीं, अशाच देशाचा शोध करून तशा देशांत जाऊन राह्यचं असं त्यानं ठरवलं. अन् तशा देशाच्या शोधार्थ निघाला. त्यासाठीं त्यानं नाना देश पालथे घातले–खूप खूप भ्रमंती केली–रान, अरण्य, मैदानं तुडवलीं–डोंगरपर्वत उलंघिले–नद्यासमुद्र ओलांडले आणि जिथं जिथं म्हणून तो गेला नि तिथली परिस्थिति त्यानं अवलोकन केली तिथं तिथं मनुष्य जात, इथुन तिथून एकच–त्यांच्यांत फारसा फरक नाहीं असंच त्याच्या निदर्शनास आलं ! तथापि तेवढ्यामुळं तो निराश झाला नाहीं, त्यानं आशा सोडली नाहीं वा आपणास हवा असणारा देश शोधून काढण्याच्या प्रयत्नांत कसूर केली नाहीं.

**– प्रं. भा. नाडकर्णी**

अनुक्रमणिका

त्याच्या भ्रमंतींत त्याच्या आयुष्याचीं बरींच वर्षं व्यतीत झालीं. तो जेव्हां आपल्या घरांतून बाहेर पडला होता. तेव्हां तो तडफदार जवान तरुण होता. पण त्याच्या त्या एकसारख्या सतत भ्रमंतींत त्याचं तारुण्य नष्ट होऊन तो आतां वयस्क नि उतरलेला माणूस दिसूं लागला होता. अधिकाधिक वृद्ध होऊं लागला होता. पण आपल्या त्या प्रयत्नांत वा निश्चयांत त्यानं खळ पडूं दिली नव्हती. अन् त्याच्या त्या निश्चयाच्या बळावरच अपेक्षित फळ त्याच्या पदरात पडण्याचं सुदैव त्याला लाभलं होतं.

कारण आतां तो अशा एका देशांत येऊन पोहोंचला होता. कीं त्या देशाविषयी त्यानं कुठंच कधीं ऐकलं नव्हतं. परंतु काय असेल तें असो, त्या देशात त्याचं पाऊल पडताच ज्या ध्येयासाठीं त्यानं आपल्या जिवाचा एवढा आटापिटा केला होता. त्या ध्येय-पूर्तीचा पाऊलवाट त्याला स्पष्ट दिसूं लागली होती. अर्थात् आपणास हव्या असणाऱ्या ज्या देशासाठीं आपण एवढं जिवाचं रान केलं होतं तोच हा देश हें समजून घ्यायला त्याला जरासा वेळच लागला. तथापि तिथलीं माणसं एकमेकांशीं गुण्यागोविंदानं वागत होतीं, सुखासमाधानानं नांदत होतीं. हें त्याच्या लवकरच प्रत्ययास आलं माणसांच्या नि जनावरांच्या राहणींतील फरक दृग्गोचर होत होता. पण आपण शोधीत असलेला तोच हा देश हे तेथील एक वृद्ध रहिवाशी भेटेपर्यंत त्याला त्याची दाद लागली नाहीं.

'काय पाहुणे, कुठून आलांत नि कुठं चाललांत ?' असं जेव्हां त्या वृद्ध रहिवाश्यानं त्याला विचारलं तेव्हां हा चिरप्रवासी माणूस उत्तर करीत म्हणाला, 'अमुकच देशाला जातो आहे असं नाहीं. तरी पण मी अशा एका देशाच्या शोधांत आहे, कीं त्या देशांतील माणसं माणसांशीं माणुसकीनं वागतात-तीं त्यांच्याशीं अमानुषपणानं वा रानटीपणानं वागत नाहींत. तसला एखादा देश तुमच्या पहाण्यात आहे का हो ? कारण तसा देश शोधून काढण्यासाठीं मी उभा हयात वृथा दवडली आहे म्हणून विचारतो.'

'खरं का काय ? अरेरे ! मग त्या कामीं तुमचे मोठे हालच झाले असतील नाहीं ? कारण त्याची मला पूर्ण जाणीव आहे म्हणून म्हणतो,' म्हातारा रहिवाशी उद्गार काढीत म्हणाला, 'पण तुम्हांला आता काळजी करण्याचं कारण नाहीं. तुम्ही आतां योग्य ठिकाणीं आलां आहांत प्रत्यक्ष आमच्या या देशात पूर्वी तशींच परिस्थिति होती. इथलीं माणसंहि एके काळीं शुद्ध रानटी होतीं. त्यांच्यांत नि जनावरांच्या वागणुकींत कांहींच फरक नसे. माणसं माणसांना तर खातच; पण आईबाप नि मुलं, भावंडं भावंडं एक-मेकांना ओळखीत नसत-मानीत नसत. तथापि ती परिस्थिति आम्हांला एका वल्लीचा शोध लागण्यापूर्वीची होती. आम्हांला त्या विशिष्ट वल्लीचा शोध लागला नि आम्ही तिचा जसजसा उपयोग करूं लागलों तसतसा आमच्या लोकांत बदल घडून आला. त्या वल्लीच्या सेवनानं आमच्या लोकांची वृत्ती बदलली नि त्याबरोबरच आमच्या देशाचं स्वरूपहि बदललं.'

'होय ? काय बरं त्या वल्लीचं नांव ?' ह्या पाहुण्यानं अधीरे-पणानं विचारलं.

'तिचं नांव कंदर्प. ऐकलंय् हें नांव-तुम्ही कधीं ?'

'नाहीं. कंदर्प ? कंदर्प ही चीज काय आहे ?' प्रवाशी पाहुण्यानं विचारलं.

'ती एक विलक्षण चीज आहे. तो एक उग्र वासाचा-नुसत्या त्याच्या दर्पानं नाकाडोळ्यांना पाणी आणणारा-रुचीला झणझणीत पण रुचकर लागणारा असा खाद्यपदार्थ आहे. तो प्रत्यक्ष पाहिल्या-शिवाय नि त्याची रुची चाखल्याशिवाय तुम्हांला त्याची कल्पना येणार नाहीं. तुम्ही मजबरोबर चला नि प्रत्यक्ष पाहूनच त्याची खात्री करून घ्या.'

असं सांगून तो वृद्ध रहिवासी त्या पाहुण्याला एका कांद्याच्या मळ्यांत घेऊन गेला. तो मळा दाखवून पाहुण्याला तो पुढं म्हणाला, 'ही पाहिलींत, या शेतांत उगवलेलीं हिरवीगार नि जाड पातींचीं नि त्यांच्या शेंड्याला निळसर पांढऱ्या फुलाचे तुरे असणारी रोपं ? या पिकालाच आम्ही कांदे म्हणतो.'

मग तो म्हातारा त्या पाहुण्याला कांद्याच्या मळ्यांतच घेऊन गेला नि तिथं सजलेलं कांद्याचं पीक त्यानं त्याला प्रत्यक्षच दाखविलं. इतकंच नव्हे तर कांद्याचं बी पेरल्यापासून तें पीक काढण्यास योग्य होईपर्यंत कसं नि कोणकोणत्या अवस्थेतून जातं हेंहि त्यानं त्याला समजावून दिलं नंतर त्यानं त्या मळ्यांतील पूर्ण तयार झालेलं एक रोपटं मुळासकट उपटून काढलं अन् त्याच्या मुळाशीं लटकत असलेलं त्याचं मूळ वा कांदा त्या पाहुण्याला खायला दिला. तो कांदा हातांत घेऊन पाहुण्यानं तो नीट निरखून पाहिला अन् त्याची नि पात्यांची रुचीहि चाखून पाहिली. त्या कांद्याच्या दर्पानं त्याच्या नाकाडोळ्यांतून भरपूर पाणीहि वाहूं लागलं. पण त्यापेक्षां त्याच्या जातीला माणसांतील अमानुषपणा वा रानटीपणा नष्ट करणारी अमोलिक वल्ली आपणास गवसली या विचारानं त्याच्या डोळ्यात जे आनंदाश्रू दाटले त्यानं तर त्याच्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर लोटूं लागला होता.

तो प्रवाशी पाहुणा आपल्या देशाला परत निघाला तेव्हां त्यानं तें कांद्याचं बी त्या वृद्ध रहिवाशाकडून न चुकता मागून घेतलं. 'हे कांदे खाल्ल्यानं मनुष्यांतील क्रूरपणा, रानटीपणा नष्ट होतो. त्यांचं सेवन केल्यानं माणसाच्या डोळ्यांत अंजन पडून तो इतर माणसांशीं माणुसकीनं वागूं लागतो,' हे त्या म्हाताऱ्या रहिवाशाचे शब्द घोकीत अन् आपण घेतलेल्या श्रमांचं एकदरीत सार्थक झालं या समाधानातच तो आपल्या स्वदेशाचा मार्ग आक्रमूं लागला.

आपण लावलेला नवलपूर्ण शोध आपल्या देशबांधवांना कधीं एकदां जाऊन सांगतों असं त्याला झालं असल्यामुळं त्याचा परतीचा प्रवास दूरचा नि कंटाळवाणा झाला नाहीं. अन् आपल्या गांवीं तो अपेक्षेपेक्षां लौकर येऊन पोंचला.

तिथं येतांच त्यानं प्रथम गोष्ट कोणती केली असेल तर ती ही कीं, त्यानं आपल्याबरोबर आणलेलं कांद्याचं बी आपल्या शेतांत पेरलं. त्या म्हाताऱ्यानं दिलेल्या सूचनेबरहुकूम तें कांद्याचं बी त्यानं आपल्या शेतांत पेरल्यावर मगच गावांतील आपल्या आतेष्ट, मित्रमंडळींना तो भेटूं लागला. पण त्याच्या दुर्दैवानं त्याला कुणीच ओळखूं शकला नाहीं. कारण एक तर आयुष्यांतील बरींच वर्षं तो गांवांत नव्हता, नि दुसरं आयुष्यभर केलेल्या कष्टतर नि त्रासदायक प्रवासामुळें त्याच्या चेहऱ्यात मोहऱ्यात आमूलाग्र फरक पडला होता. तशांत त्या गांवचीं माणसं पूर्वी होतीं तशीं अद्याप रानटीच होतीं. त्यामुळं इतक्या दिवसांनी भेटलेल्या त्या गांवकऱ्याला ते कसं ओळखूं शकणार ! त्यांनी त्याला धड ओळख

अनुक्रमणिका






दाखविली नाहीं कीं त्याची विचारपूसहि केली नाहीं; तर त्याचं म्हणणं ते कुठून ऐकून घेणार! उलट, तो कुणी-तरी उपटसुंभ आहे अन् आपल्याशीं तो बादरायण संबंध जोडूं पहात आहे असंच त्यांना वाटलं; अन् ते त्याला मारून खाण्या-चाच विचार करूं लागले!

'अरे बंधूंनो, तुमचा कांहीं तरी गैरसमज होतो आहे. खरंच मी तुमच्यापैकींच एक आहे. मी तो आमका अमका. तुम्ही मला ओळखत नाहीं का? आतां मी मध्यंतरीं इथं बरेच दिवस नव्हतों; अन् वयोमानाप्रमाणं माझ्या चेहऱ्या मोहऱ्यांतहि बराच फरक पडला आहे; म्हणून तुम्ही मला ओळखूं शकत नाहीं. बाकी मी तोच आहे. तुमच्यासाठीं मी केवढा त्रास सोसला आहे-स्वार्थत्याग केला आहे. तुमच्यासाठीं किती तरी लांबून एक खास वल्ली मी घेऊन आलों आहे, नि ती मी माझ्या शेतांत लावली आहे. ती तुमचंच काय, साऱ्या मानवजातीचं हितकल्याण करणार आहे.' असं तो त्याना परोपरीनं सांगण्याचा प्रयत्न करीत होता. पण ते लोक त्याचं कांहींसुद्धा ऐकून घेण्यास तयार नव्हते. त्याला मारून खायचा ही एकच गोष्ट ते दातीं धरून बसले होते अन् त्याप्रमाणं त्याना त्याला शेवटी मारून खाल्लाहि!

आणि त्याचा त्यानीं तसा बळी घेतल्यावर कांहीं दिवसांनीं त्या दुर्दैवी माणसाच्या मित्रांना त्याच्या शेतांतील एका जमि-नीच्या तुकड्यांत इतर पिकाहून कांहींसं वेगळंच दिसणारं पीक दृष्टीस पडलं. तसलं पीक त्यानीं पूर्वी कधींच पाहिलं नव्हतं. त्यासंबंधीं कुतुहल उत्पन्न होऊन त्यापैकीं एकानं त्याचं एक रोपटं उपटून काढलं. अन् त्याच्या मुळाशीं लागलेलं फळ चाखून पाहिलं. त्याला जरी भयंकर उग्र वास येत होता नि त्याची रुचि तिखट होती तरी एकंदरीत ते फळ त्यांना खमंग नि रुचकर लागलं. आणि तेंच त्याच्या मित्रानं देश पर्यटन करून एवढ्या सायासानं पैदा करून आणलेलं कांद्याचं रोपटं होतं. अर्थात् तें कशाचं होतं हें माणुसकीला अद्याप पारखे असलेल्या त्या लोकांपैकीं कुणालाच कळणं शक्य नव्हतं. पण ज्याच्या ज्याच्या नाकांत त्या कांद्याचा विचित्र दर्प शिरला नि ज्यानीं ज्यानीं त्याची रुची चाखली ते त्याची इतराकडे शिफारस करूं लागले. आणि ज्याना ज्याना त्या वल्लीचा सुगावा लागला त्यानीं त्यांनीं त्या शेतांत येऊन त्या फळाचा नि पातीचा भरपूर आस्वाद घेतला. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं ज्यानीं ज्यानीं त्या कंदर्प उर्फ कांद्याचा आस्वाद घेतला त्यांना आपणांत कांहींतरी आमुलाग्र बदल झाल्याचं त्याच्या प्रत्ययास आलं. माणसं हीं माणस आहेत-तीं जनावरं नाहीत-त्याच्याशीं आपण माणुसकीला धरूनच वागलं पाहिजे, याची त्याना जाणीव निर्माण होऊं लागली. इतकंच नव्हे तर ज्या महा-भागानं-त्या शेताच्या मालकानं एवढा स्वार्थत्याग करून महाप्रयासानं ती वल्ली कितीतरी लांबून पैदा करून आणली नि त्याच्या साधनानं आपणास माणुसकी शिकवली त्याच्याविषयीं आपण यत्किंचितहि कृतज्ञता न दाखवतां, उलट त्याचा बळी घेऊन कृतघ्नताच व्यक्त केली याचा त्याना पश्चात्ताप झाला.

तथापि माणसाना माणुसकी शिकवण्यापायीं तो महाभाग स्वतः जरी बळी पडला तरी आपल्या देशबांधवाना कांद्यासारखी वल्ली बहाल करून आपलं जिवितकार्य सफल केलं याबद्दल तो हुतात्माच ठरला. त्याच्या त्या पुण्यशील कृत्याची आठवण त्याच्या देशबांधवास शिवणाऱ्या प्रत्येक घांसाबरोबर होत असते. • • • •

# नाटक झालें स्पर्धेचें हें



—रसिक मनोहर

नवरात्र संपलें कीं दसरा उजाडतो; आणि दसरा संपला कीं सरकारच्या वार्षिक नाट्य-स्पर्धांना सुरुवात होते. दसऱ्याप्रमाणेंच ह्या स्पर्धांनी रसिकाच्या सांस्कृतिक जीवनांत स्थान मिळविलें आहे हें निश्चित्! दसरा येतो नि जातो. तसंच सरकारी नाट्यस्पर्धांचं वार्षिक सत्र येतं नि जातं. निकाल जाहिर होतात, विजेत्यांना पारितोषिकं मिळतात आणि रसिक व हौशी नाट्यसंस्था आतुरतेनं पुढील वर्षाची वाट पहातात. हौशी कलावंताच्या उत्साहाला क्षणंमात्र आलेलं उधाण ओसरतं व त्यांच्या नाट्यविषयक चळवळीवर पडदा टाकला जातो. ही दरवर्षीची प्रथा! एखादे वेळेस श्रीमती दुर्गाबाई खोटे ह्यांच्यासारख्या अधिकारी व्यक्तिनं नाटयसंमेलनाच्या अध्यक्षपदावरून ह्या नाट्यस्पर्धा बंद कराव्यात असं जाहीर करताच जाणकार मंडळी व रंगभूमीच्या हित-चिंतकांत खळबळ उडते. ह्या स्पर्धांचं प्रयो-जन काय, तें कितपत सफल झालं आहे इत्यादि विचार रसिकाच्या मनांत येऊं लाग-तात. श्रीमती दुर्गाबाई खोटे ह्यांच्यासारखी एकदम आत्यंतिक टोंकाची भूमिका घेऊन ह्या नाटयस्पर्धा बंद कराव्यात हा निर्णय घेण्याइतकी परिस्थिती गंभीर आहे का? ह्या स्पर्धांत कांहीं उणीवा असण्याचा संभव आहे कीं ज्यामुळें सबंध स्पर्धेचं प्रयोजनच नाहीसं व्हावं! मग ह्या उणीवा दूर करून, योजना-पूर्वक दुरुस्त्या घडवून आणल्या तर ह्या स्पर्धेची जोमानें, सुदृढपणें वाढ होणें अशक्य आहे कां? ह्या स्पर्धा जर हौशी लोकांसाठींच आहेत तर त्याच्या हौसेला आव्हान देऊन स्पर्धेत नाट्यविषयक अधिक कडक दंडक घालून व मान्यवर व्यक्तींच्या अनुरूप सल्ल्या-नुसार योग्य त्या सुधारणा घडवून, ह्या स्पर्धेचा दर्जाच वाढवून एकंदरीनें नाटयस्पर्धेची आवश्यकता निःसंदिग्धपणें कां सिद्ध होऊं नये?

## हौसेचे मोल आणि तोल

हौशी नाट्यसंस्थांची प्रगति ज्या तिडीकेनें व्हावयास हवी त्या तिडीकेनें झालेली दिसत नाहीं. ह्याचं प्रमुख कारण म्हणजे तपश्चर्या आणि तळमळ हीं जीं नाटकाच्या यशस्वितेची मुख्य अंग, त्याचीच नेमकी ह्या हौशी नटा-मध्यें आढळणारी उणीव! त्याच्यामध्यें प्रामुख्यानें आढळते ती तडजोडीची वृत्ती!

हौसेला मोल नसतें असं म्हणतात. नसेना का! पण निदान त्याला तोल असावा, दर्जा असावा हीच रसिकांची अपेक्षा! आणि म्हणू-नच हौशी नाट्यसंस्थाबाबत प्रमुख तक्रार आहे ती हा तोल अजिबात न साभळल्याबद्दल!

स्पर्धेसाठीं हवीं असलेली जिद्द व मेहनत यंदाच्या नाट्यसंघात अभावानेंच पुरेपुर प्रत्य-यास आली. पाठातर, हालचालीं व सात्विक अभिनय ह्या मुलभूल गोष्टींवर बहुताशी दुर्ल-क्षच झालेलें आढळलें.

सरकारचें अनुदान चालू ठेवण्यासाठींच पुष्कळशा संस्था येनकेन प्रकारें प्रयोग सादर करतात असें वाटतें, नाहींतर "श्रीमंत" "बाधा" ह्यासारखीं दर्जेदार नाटकं स्पर्धेत सादर करणाऱ्या कलाकेंद्राला यंदा अंतीम स्पर्धेपर्यंत सुद्धां मजल कां गांठतां येऊं नये? आय्. एन्. टी. सारख्या आघाडीच्या हौशी संस्थेला 'कांचेच्या खेळणीं–'चा अपवाद वगळल्यास क्वचितच अंतीम स्पर्धेचा पल्ला गांठता यावा ही शोचनीय स्थिती नव्हे काय? वर्षानुवर्षे स्पर्धेत भाग घेणाऱ्या कित्येक संस्थाना अजून अंतीम स्पर्धेपर्यंत पोंचतां आलेलं नाहीं. उदा. 'नाट्य विकास' कल्याण (श्री. राजाभाऊ साठे त्यांच्यासारखा मातब्बर संगीत नट त्यांत असून सुद्धां!) अशा अनेक संस्था आहेत. हे उदाहरण केवळ वानगीदाखल. नाटकांच्या दर्जाचा विचार केल्यास एक गोष्ट स्पष्टपणें जाणवते ती ही कीं गेल्या दोन तीन वर्षांत पुण्या–मुंबईकराचा दर्जा दिवसें दिवस खालावत चालला आहे. मुंबईकराना 'तीन अंकी हॅम्लेट'ची पातळी अजुन गांठता आली नाहीं. 'श्रीमंत' सादर करणाऱ्यांनींच 'सारेच सज्जन–' सादर करावें ह्यासारखी दुःखाची गोष्ट नाहीं. 'कांचेची खेळणीं–' सादर करणाऱ्या (उसना दिग्दर्शक व उसने कलावंत घेऊन का होईना!) आय. एन. टी नें कै. गडकऱ्यांच्या समर्थ 'पुण्यप्रभाव–'चा आणि कै. नाना जोगांच्या दर्जेदार 'भारती'चा खेळखंडोबा करावा ह्यासारखी दुसरी शोचनीय गोष्ट नाहीं. लागोपाठ तीन वर्षे बक्षीस पटकाविणाऱ्या 'गोवा हिंदु असोसि-एशननं यंदा सादर केलेलं 'मृच्छकटिक–' त्यांच्या पूर्वीच्या 'खडाष्टक' व 'संशय कल्लो-ळ'च्या तोडीचं होतं असं ह्या संस्थेचा निष्ठावंत

अभिमानीहि म्हणूं शकणार नाहीं! पुणेंकरांच्या बाबतींत हेंच म्हणतां येईल गतवर्षीचं 'वैदेही' सोडल्यास त्यांना सुद्धां अजून 'वेड्याचं घर उन्हांत–' 'अ–पूर्व बंगाल'ची पायरी गांटता आलेली नाहीं. तांत्रिक करामती, नाटकाचे नवेनवे विषय, हेंच ह्या मंडळींचं दिवसें दिवस प्रमुख आकर्षण बनत चाललं आहे. परंतु नाट्यवस्तु जिवंत व प्रभावी अभिनयाच्या द्वारें सादर करून चिरकाल स्मरणांत राहील अशी एखादी नाटयकृती त्यांना सादर करतां आलेली नाहीं.

मुंबई–पुणें मार्गावर असलेल्या ठाणेकरांची स्थिति तर अगदींच शोचनीय आहे. मुंबई-पासून ठाण्याचें अंतर फारसें नसतानाहि नाटय-गुणांत ही मंडळी मुंबईकरांच्या शेंकडों मैल दूर असल्याची खात्री पटते! मुंबईकरांचें तांत्रिक कसब व नेपथ्यांतील नवेनवे प्रयोग, पुणेकरांचा जिवंत अभिनय व सकस आणि नावीन्यपूर्ण नाटय विषय ह्यांचा प्रत्यहीं लाभ घडत असतांना सुद्धां आज कित्येक वर्षे ही मंडळी प्राथमिक स्पर्धेत 'ठाण–' मांडून बसली होती! यंदाच प्रथमतः त्याचं नाटक अंतिम स्पर्धा गांठूं शकलं!

ह्या दृष्टीनें विचार केल्यास मुंबई–पुण्या बाहेरील मंडळी दिवसेंदिवस प्रगति करत आहेत हे निःशंकपणें कबूल केलें पाहिजे. मुंबई–पुणेंकरांचे कधींमधीं बघावयास मिळ-णाऱ्या प्रयोगापासून ह्या लोकांनीं बरीच स्फूर्ति घेतलेली दिसते. आडबाजूच्या गांवीं असलेली साधनांची उणीव, नटी मिळविण्याची समस्या, योग्य मार्गदर्शनाचा अभाव आणि इतर नाटय-विषयक सोयींची गैरहजेरी ध्यानांत घेतली म्हणजे त्यांच्या प्रगतीचं कौतुक वाटतं! जळगांवच्या 'विकास मंडळा'नें सादर केलेल्या 'अक्षांश रेखांश'चा आवर्जून उल्लेख करावा लागेल. चोख पाठांतर, पेलेल अशा नाटकाची निवड, मेहनत व नाटय-वस्तूला अनुरूप असं सुंदर नेपथ्य वगैरे गोष्टींमुळें जळगांवसारख्या ठिकाणाहून एक बऱ्यापैकीं प्रयोग सादर व्हावा ह्याचंच कौतुक वाटतं! तीच गोष्ट सांगलीकरांची. 'श्रीमंत' सारखं कठीण नाटक केवळ आकर्षक नेपथ्य व प्रामाणिक श्रम, हौसेची इर्षा ह्यांच्या जोरावर सादर करून त्यांनीं पहिल्या पांचांत नंबर पटकाविला. ठाणें केंद्रांतून आलेले 'टाकाऊ' नाटयप्रयोग व 'गोवा हिंदु असोसिएशन'नें 'राजेशाही थाटांत-' सादर केलेल्या 'मृच्छकटिका'च्या अपयशाच्या पार्श्वभूमीवर जळगांव, सांगलीकरांची प्रगति खुलून दिसते!

### "पडद्याला टाळी!"

अनेक संस्था भरमसाट खर्च करून नेपथ्याचा असा कांही झगमगाट उडवून देतात कीं व्यावसायिकांनीहि तोंडांत बोट घालावं! ह्या भरमसाट खर्चाचं अर्थातच फार थोडं चीज होतं. कारण पडद्याला टाळी म्हणजे नाटकाच्या यशस्वितेची हमी असं मुळींच नाहीं. अपेक्षेप्रमाणं बक्षिस मिळालं नाहीं कीं खर्चाच्या डोंगराखालीं संस्था खचून जाण्याचाच संभव अधिक! पण तरीहि यंदा पडदा उघड-तांच लक्षांत यायचं ते बहुतेक संस्थांचं नेप-थ्याचं वेड! पडदा वर जातांच आकर्षक नेपथ्य घटकाभर रसिकांचे लक्ष वेधून घ्यायचं आणि आतां छानपैकीं रंगत येईल अशी आशा निर्माण व्हायची. पण पात्रांनीं बोला-यला सुरवात केली कीं हळूंहळूं अपेक्षाभंग होऊं लागायचा! बऱ्याच नाटकांना "सायक्लो-रामा" वापरण्यांत आला. आकाशाचे फिरते रंग उडत्या ढगांसहित दाखविण्यांत आले.



परंतु हें सर्व करतांना अभिनयाकडे अक्षम्य दुर्लक्ष झालें.

नेपथ्य रचनेचा डोलारा किंवा थाटमाट अत्यावश्यक आहे अशीच जणूं साऱ्या स्पर्धकांची कल्पना झालेली ! जणूं नेपथ्य हा बक्षिस मिळविण्याचा हुकमी एक्काच ! नेपथ्याचा बडेजाव अकारण माजला असून अभिनय साधनेकडे, पात्रांच्या रेखीव व पद्धतशीर हालचालींकडे पुरेसें लक्ष दिलें जात नाहीं. अशा वृत्तीनें नटवर्गाचें महत्त्व कमी होत जाऊन "पडद्यापागील" तंत्रज्ञांना फाजील महत्व येऊं लागले आहे. परंतु येथेंही नेपथ्यासाठीं नेपथ्य असाच खाक्या दिसतो !

"मृच्छकटिक" मध्यें तर नेपथ्यानें, प्रकाशयोजनेनें अभिनयावर, कथावस्तूवर उघड उघड मात केलेली पहावी लागली. परिणामीं नेपथ्य, प्रकाशयोजना व अभिनय ह्याचं सुंदर मिश्रण होऊन, एकसंध परिणाम सादर करणारी कलाकृती निर्माण होण्याऐवजीं नेपथ्य व अभिनय, ह्यांनीं एकमेकांशीं फटकून वागल्याचं केविलवाणं दृश्य पहावं लागलं ! नुसत्या तांत्रिक करामतीकडे लक्ष पुरविल्यामुळें ह्या नाटकाची रंगावृत्ती इतक्या गाफीलपणें तयार करण्यांत आली कीं, नाटकाचं नांव "मृच्छकटिक" च का असा संभ्रम पडूं लागला !

आकर्षक नेपथ्य व प्रकाशयोजना ह्यांचीच यंदा चुरस लागली. त्यामुळेंच परिक्षकांना नेपथ्य व प्रकाशयोजनेच्या बक्षिसाची निवड करतांना फार श्रम पडण्याचा संभव आहे. परंतु येथेंहि त्यांनीं आकर्षक नेपथ्याच्या बाह्य देखाव्याला व प्रकाशयोजनेच्या तांत्रिक करामतीला बळी न पडतां, कांहीं निश्चित् कसोट्या लावूनच बक्षिसं दिलीं ह्याबद्दल त्यांना धन्यवाद !

## येथें नाट्यस्पर्धेचे परिक्षक मिळतात !

मुबई, दादर व ठाणें केंद्रावरील गेल्या कांहीं वर्षांतील स्पर्धा पाहिल्या म्हणजे एक गोष्ट ठळकपणें नजरेंत भरते. नाट्यस्पर्धेचे परिक्षक ही कांहीं व्यक्तिंची मिरासदारी होऊन बसली आहे. पूर्वी "साहित्य संघां"त आणि आतां "रंगभवनांत" होण्याऱ्या स्पर्धेसाठीं एक टराविकच परिक्षक बहुतांशी नेमेचि येणाऱ्या पावसाळ्याप्रमाणें नेमला जातो ! काहीं वेळेला नांवं तींच असली तरी जागा बदलतात. म्हणजे ठाणें केंद्रातून "रंगमंदिरांत" बदलीं किंवा "अमर हिन्द मंडळां" तून "रंगभवनां"त वर्णी. अंतिम स्पर्धेचे परिक्षक दर दोन तीन वर्षांनून आलटून पालटून तेच येतात ! एकूण काय, अंतिम स्पर्धेचं "पंचायतन" किंवा प्राथमिक स्पर्धेतील "तीन शिलेदार" ठराविक व्यक्तींमधून निवडले जातात आणि तेंही नाट्य ही महाराष्ट्राची वैशिष्ट्यपूर्ण कला आहे असं ज्या महाराष्ट्रांत बोललं जातं त्याच्या राजधानींत ! मुंबई सारख्या ठिकाणीं ही परिस्थिती तर बाहेरगांवीं केवढं दुर्भिक्ष असेल ह्याची कल्पनाच करवत नाहीं.

मान्यवर विद्वान् व नाट्यक्षेत्रांतील जाणते अधिकारी जर परिक्षक म्हणून मिळतील तर त्यांच्या निर्णयाबद्दल कुठलीहि शंका बाळगण्याचें कारण उरणार नाहीं. आणि स्पर्धेलाहि एक निराळाच दर्जा प्राप्त होईल. समाजाला सुसंस्कृत चोखंदळ बनविण्याची अशा व्यक्तींची एक प्रकारें नैतिक जबाबदारीच असते. आणि ती त्यांनीं टाळतां उपयोगाची नाहीं. विद्वान् व व्यासंगी मंडळींनीं यापुढें तरी पुढें येऊन सरकारशीं सहकार्य करावं हीच सदिच्छा !

आतां कांहीं मंडळी जरी मनांतून तयार असली तरी त्यांनीं सरकारच्या अटी जाचक वाटण्याचा संभव आहेच ! असं जर असेल तर सरकारन शक्य तेवढी तडजोड करून परिक्षकांच्या मानधनाचा, प्रवास खर्चाचा, परिक्षण पद्धतीचा प्रश्न सलोख्यानें सोडवून अशा व्यक्तींचं सहाकार्य जरूर मिळवावं. कारण मान्यवर निःस्पृह परिक्षक मिळणं हे सरकारच्याच फायद्याचं आहे. निकालाच्या सच्चेपणाबद्दल आणि निःस्पृहतेबद्दल स्पर्धकांनीं व प्रेक्षकांना विश्वास वाटणं हें केव्हांही योग्यच होय. नाहींपेक्षा स्पर्धकांचा निकालाच्या न्यायाबद्दल विश्वास उडून हे कांहीं खरं नव्हे अशी त्यांची समजूत झाल्यास त्यांना स्पर्धेत भाग घेण्यास उत्सह राहिल कसा ? नाट्य क्षेत्रांतील मान्यवर अधिकारी, व्यासंगी व सरकार ह्यांची सांगड पडून हा प्रश्न जितका लवकर सुटेल तितका बरा !

परिक्षक मंडळ बनविण्याची पद्धतीहि बदलली पाहिजे. शक्यतो एखादा नाटककार, दिग्दर्शक, व्यासंगी टीकाकार, नामांकित नट किंवा नटी (अर्थात् रंगभूमीवरील !) रंगभूमी वरील तांत्रिक गोष्टी जाणणारा अधिकारी इत्यादिचा परिक्षक मंडळांत समावेश होणं इष्ट आहे. अलिकडे परिक्षक मंडळांत विचित्र नांवं ऐकूं येतात—मराठीचे प्राध्यापक, नव कवि, वर्तमानपत्रांतलें स्तंभलेखक, सिने-क्रीडा समीक्षक, एखादी सिने-नटी (कीं जी फावल्या वेळांत रंगभूमीवर पदार्पण करते.) यंदाच्या अंतिम स्पर्धेतील परिक्षक मंडळांत तर एका हौशी नटाचीहि वर्णी लागली होती ! मराठी रंगभूमीवर एवढे नामांकित नट होऊन गेले, पण त्यांपैकीं अजून एकाचाहि परिक्षक मंडळांत समावेश होऊं नये हें नवल नव्हे कां ? अलिकडे प्रादेशिक विचार करून परिक्षक नेमण्याची प्रथा पडली आहे तीही घातुक आहे. नाट्यासारख्या अभिजात कलेच्या स्पर्धेच्या वेळीं तरी परिक्षक नेमतांना त्याच्या नाट्यविषयक अंगोपगांतील अधिकाराचा, व्यासंगाचा व दर्जाचाच विचार प्रामुख्यानें व्हावयास हवा !

## परिक्षका, तुझा निकाल कसा ?

परिक्षकांनी कितीहि निःस्पृहपणें, निर्भीडपणें निर्णय दिला तरी तो लोकमान्य होइलच अशी खात्री नसते. प्रत्येक परिक्षक सुद्धां रामशास्त्रीच असावा अशीहि अपेक्षा करणं चुकीचंच ! असं असलं तरी निकाल लावतांना परिक्षकांच्या व्यक्तिगत आवडीनिवडी (क्वचित् प्रसंगी वैयक्तिक हेवेदावे !) चाच जास्त जोर पडत असावा असं गेल्या कित्येक वर्षांचे निकाल पाहून वाटतं ! नाहींतर लोकांच्या अंदाजातहि नसलेलीं नाटकं बक्षिसपात्र कशीं होतात ? यंदा तर ठाणें येथें जाहीर सभेंत परिक्षकांच्या निकालाचा निषेध करण्यांत आला ही गोष्ट निकालाबाबत प्रेक्षक किती जागरूक असतात. ह्याचीच साक्ष पुरवते !

प्रत्येक परिक्षकानें गुण देऊन अंतीं सर्वांनीं चर्चा करून निकाल ठरवायचा अशी पद्धत अंमलांत आणण्यांत येत असल्याचं ऐकूं येतं. ह्या पद्धतींत तसं पाहिलं तर कांहीं वावगं नाहीं. परंतु ही चर्चा निःपक्षपातीपणानें नाट्यकलेच्या निश्चित् कसोट्या लावून झाली तर ! नाहींतर एखाद दुसरा परिक्षक आपल्या दुराग्रहि अट्टाहासामुळें साऱ्या चर्चेलाच खीळ घालूं शकतो व इतर परिक्षकांना तडजोड काढून







अनुक्रमणिका

मार्ग काढवा लागतो. अशा तडजोडीच्या वेळीं एखाद दुसरं लायक नाटक सुद्धां इतकं दूर फेंकल जातं कीं त्याची नांवानिशी-सुद्धां निकालांत रहात नाहीं. गेल्यावर्षी 'वैदेही' हें नाटक निदान पहिल्या दोहोंत तरी यावं ही बहुसंख्य प्रेक्षकांची अपेक्षा (अगदींच अढाणी लेफाचे!) पण तें पहिल्या पांचांत सुद्धां झालं नाहीं कीं एखाद्या वैयक्तिक पारितोषिकाचं मानकरी झालं नाहीं. जणूं तें नाटकच स्पर्धेत झालं नाहीं. तीच गोष्ट 'वर्तुळाचें दुसरें टोंक' ची. हेंहि नाटक पारितोषिकास वा उत्तेजनास नालायक ठरलें!

प्रादेशिक विचार करून परिक्षक नेमले कीं हा धोका अधिकच वाढतो! मग त्यांतून कांहीं परिक्षक जुन्याचे अभिमानी तर कांहीं नव्याचे, कांहीं ह्या 'ग्रुप' चे तर कांहीं त्या 'स्कुल'चे असले म्हणजे कांहीं विचारूं नका! प्रत्येक जण मग आपलंच घोडं दामटण्याचा प्रयत्न करतो. ह्या सांवळ्या गोंधळांत निकालाचा 'निकाल' लागल्यास नवल नाहीं. निकालानंतर कुणाहि परिक्षकांशीं चर्चा केल्यास त्यांना निकाल पटवून देणं कठीण जातं. मग प्रत्येक वेळीं इतर गैरहजर परिक्षकांवर निकालाचं खापर फोडलं जातं. अलिकडे तर परिक्षकांची नांवं वाचूनच लोक सर्वसाधारणपणें कोणाला बक्षिस मिळण्याचा जास्त संभव आहे ह्याचा अंदाज घेत असतात, तर कांहीं संस्था अमुक तमुक परिक्षक आहे तर आमचा कारभारच आटोपला म्हणून अनुदान मिळावं म्हणून 'Also Ran' च्या धर्तीवर स्पर्धेत भाग घेतात!

अंतिम स्पर्धेतलीं बहुतेक नाटकं पाहून हीं नाटकं अंतिम पल्ला तरी कशी गांठूं शकली हाच प्रश्न पडतो. ह्याचं एक कारण म्हणजे परिक्षकांची तडजोड करून निकाल देण्याची वृत्ति! मुंबई–पुणें–नागपूर व इतर ठिकाणाचीं नाटकें ह्यांच्या दर्जामध्यें फार मोठा फरक आहे इतकंच! असं असलं तरी अंतिम स्पर्धेला येणारं नाटक एका ठराविक दर्जाचं असणं अवश्य आहे. आणि म्हणूनच एखाद्या केंद्रांतून पहिल्या वा दुसऱ्या क्रमाला योग्य असं नाटक नसेल तर ते बक्षिसच दिलं जाऊं नये. केवळ उत्तेजनासाठीं उत्तेजन काय कामाचं? त्यापेक्षां लायकीनुसार उत्तेजन हीच दृष्टि निरोगी! त्यामुळें प्रत्येक केंद्रावरचा दर्जा आपसुकच सुधारला जाईल. अमूक एक विशिष्ट दर्जा गांठल्याशिवाय बक्षिसच दिलं जाऊं नये. ह्यासाठींच स्पर्धेमध्यें केवळ गुणात्मक दृष्टि ठेवूं नये...तर त्या ऐवजीं स्पर्धात्मक (Competitive) आणि दर्जात्मक (Qualitative) असे गमक असावेत.

केवळ उत्तेजनासाठीं पहिलीं दोन नाटकें अंतिम स्पर्धेला पाठवायचींच व प्राथमिकें स्पर्धेत बक्षिसं ही द्यायचीच अशी प्रथा पडली कीं दर्जा नसलेल्या नाटकांना सुद्धां बक्षिस देण्याची सोय होते. गतवर्षी 'रंगभवन' मधल्या प्राथमिक स्पर्धेत पहिलं बक्षिस 'वाल्मिक' व 'वर्तुळाचें दुसरें टोंक' मध्यें विभागून दुसरं बक्षिस 'पुण्यप्रभाव' ला देण्यांत आलं! अर्थात् पहिलीं दोनच अंतिम स्पर्धेत आली. परंतु परिक्षकांनीं दुसरं बक्षिस विभागलं असतं तर तीन तीन नाटकं अंतिम स्पर्धेत आलीं असतां. त्याच हिशोबानं प्रत्येक केंद्रांतून तीन तीन नाटकं अंतिम स्पर्धेला आलीं तर पहायलाच नको. क्वचित् प्रसंगीं एखाद्या केंद्रातून पहिल्या वा दुसऱ्या क्रमांकाच्या लायकीचं नाटक नसलं तरी उत्तेजनाच्या नांवाखाली व त्यांच्या बक्षिसाच्या आपण आड कां या ह्या विचारानं त्यांना अंतिम स्पर्धेला पाठविण्यांत येतं. अशावेळीं अंतिम स्पर्धेला न पाठवितां प्राथमिक स्पर्धेत बक्षिस दिलं गेलं तर तें अधिक श्रेयस्कर ठरणार नाहीं कां?

उत्तेजन देतांना प्रादेशिक विचार करण्यांत येतो कीं काय अशी शंका यंदांचीं वैयक्तिक बक्षिसं पाहिलीं म्हणजे येतो. 'प्रेमा तुझा रंग कसा?' मधल्या कु. भारती मराठे हिला बक्षिस न देतां तें कु. नलिनी शर्मा (काळी माती, खारें पाणी) हिला देण्यांत आलं. तसंच सौ. आशालता वाबगांवकर (मृच्छकटिक) ह्यांनीं कसलाच बरावाईट अभिनय न करतां (खरंतर ह्या नाटकांत अभिनय असा कुठं दिसलाच नाहीं–फक्त श्री. विनायक पैच्या मैत्रैया खेरीज!) त्यांना बक्षिस देऊन लागोपाठ तीनदां बक्षिस घेऊन Hat-trick करण्याची संधी देण्यांत आली!

परिक्षकांनीं निकाल आपल्या आवडीनुसार लावण्याचं त्यांना स्वातंत्र्य आहेच, मग भले त्यांचा निकाल लोकांना पसंत पडो अगर न पडो! पण प्रश्न आहे तो संबंध निकाल वाचल्यानंतर परिक्षकांनीं कांहीं निश्चित् कसोट्या लावल्या आहेत ह्याची साक्ष पटण्याचा! त्यांच्या निकालानें रसिकांना निश्चित् मार्गदर्शन व्हायला हवं. यंदाच्या नेपथ्याचं व प्रकाश योजनेचं योग्य बक्षिस देऊन परिक्षकांनीं ही कामगिरी चोख बजावली आहे. परंतु इतर बाबतींत तसं म्हणतां येणार नाहीं. प्रा. वल्लाळची मध्यवर्ती भूमिका बारीक सारीक छटांसहित साकार करून सुद्धां प्रा. भालबा केळकर ह्यांना वैयक्तिक अभिनयाचं परितोषिक मिळालं नाहीं त्याचं आश्चर्य वाटल्यावाचून राहिलं नाहीं. 'सुंदर मी होणार' मधली अनेकांना न जमलेली (परिक्षक श्री. दामू केंकरे सुद्धां!) 'संजय' ची भूमिका वस्तुनिष्ठपणें व यथार्थतेनें सादर करणाऱ्या नटाला उत्तेजन मिळालंच नाहीं!

## कांहीं सूचना

स्पर्धक संस्थांना आपल्या नटवर्गांना अभिनय साधना, आवाजाची कमाई (यंदा अंतिम स्पर्धेत कित्येकदां पात्रांचे संवाद लाऊड स्पिकर्सच्या सहाय्यानें सुद्धां मागील लोकांना ऐकूं येत नव्हते व परिणामीं प्रेक्षकानांच "'आवाजा' ची आरोळी ठोकावी लागे!) इत्यादिबाबत अभ्यासपूर्ण मार्गदर्शन करण्याची तजवीज करावी – मान्यवर व्यक्तींची नेमणूक करून वा सहकार्य मिळवून! आणि दर्जेदार नाट्यनिर्मिती करण्याचा निष्ठापूर्वक प्रयत्न करावा. तसंच स्पर्धेत नाटक सादर केलं कीं आपली जबाबदारी संपली असं न मानतां आपल्या केंद्रांवरील इतर संस्थांची नाटकं पहाण्याचं सौजन्य दाखवावं किंवा आपल्यांतील एखाद्या जागत्या प्रतिनिधीकडून आपल्या केंद्रातील (शक्य असेल तर अंतिम स्पर्धेत सुद्धां) इतर नाट्यप्रयोगांचा तौलनिक दृष्ट्या अभ्यास करून एक अहवाल तयार करून घ्यावा व आपल्या संस्थेचा दर्जा वाढविण्याच्या दृष्टीनें पद्धतशीर प्रयत्न करावा.

प्रत्येक केंद्रांवर होणाऱ्या नाट्यप्रयोगांबाबत तेथील परिक्षकांनीं एक सर्वसाधारण अहवाल सादर करावा व तो सरकारनें प्रसिद्ध

(पान ५६ वर)

अनुक्रमणिका




● पद्मभूषण फडके ● ७ वें राज्य-कला-प्रदर्शन !
● आजचा 'पद्मश्री' क्रिकेट

## साहित्य

### पद्मभूषण श्री. ना. सी. फडके

यंदाच्या प्रजासत्ताक दिनानिमित्त ज्या पंचावन्न भारतीय नागरिकांना पदव्या देऊन गौरविण्यांत आलें त्यांत सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय साहित्यिक श्री. ना. सी. फडके ह्यांचा अंतर्भाव झालेला आहे ही मराठी साहित्याच्या इतिहासांत एक गौरवास्पद अशी घटना घडली आहे. फडक्यांना 'पद्मभूषण' ही पदवी मिळाल्यामुळें त्यांचा जो गौरव झाला त्यामुळें कांहीं साहित्यिकांना पोटदुखी झाल्याची वदंता आहे, पण आपले विवळणें प्रगट झालें तर आपलेंच हसें होईल या समाजामुळें किंवा अंगीं असलेल्या शिष्टाचारामुळें कदाचित् ही पोटदुखी खासगीच राहिली. पण एके काळीं फडक्यांना स्नेही म्हणून मानणाऱ्या एका वृत्तपत्रकारानें ही पोटदुखी जाहिर करून आपल्या साप्ताहिक टवाळींत फडक्यांच्या कौटुंबिक संबंधाचा उल्लेख करून एका 'मामुली' कोटीनें त्यांना खिजवण्याचा प्रयत्न केला आहे.

असल्या टीका फडक्यांच्या खिजगणतींत येत नसल्या तरी मंगल प्रसंगी श्वानरव करणाऱ्या वृत्तपत्रकाराची कुणाहि सज्जनाला चीड येईल. प्रा. फडके ह्यांचा महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे पुण्यांत जो सत्कार झाला त्यावेळची अल्प उपस्थिति ध्यानांत घेतां कुणाकुणास पोटदुखी झालीं आहे याचा आढावा सहज घेतां येईल. प्रस्तुत प्रसंगीं सन्मानास उत्तर देतांना फडक्यांनीं काढलेल्या समर्थनपूर्वक उद्गारांनीं ही पोटदुखी अधिकच तीव्र होऊन वृत्तपत्रांत पुन्हां एकदां वमनास सुरवात झाली आहे. वास्तविक फडक्यांना पदवी मिळाली ती त्यांच्या प्राध्यापकीय पेशाबद्दल नसून त्यांच्या साहित्यसेवेबद्दल आहे हें कुणाहि सामान्यबुद्धि वाचकांच्या ध्यानांत यावें. आणि जर एखाद्याचा साहित्यसेवेबद्दल गौरव झाला, तर त्याचें साहित्य सरकारदरबारीं मान्य झालें असें जर त्यानें म्हटलें तर तें अतार्किक अथवा अवास्तव कसें ठरतें हेंच समजत नाहीं. आणि हें प्रा. फडक्यांनीं म्हटल्यामुळें त्यांची डिप्लोमसी विशद करतांना प्रस्तुत पदव्यांची पातळी जोखण्याचें कसब दाखवण्याची करामतहि प्रस्तुत वृत्तपत्रकारानें केली आहे. फडक्यांना पद्मभूषण पदवी मिळाली ह्याचा अर्थ फडक्यांनीं लिहिलेली ओळन् ओळ सरकारमान्य झाली आहे असा करणें हें फक्त मंदबुद्धीलाच साधूं शकेल [ आणि खुद्द फडक्यांचा तसा दावा नसावा ] सुप्रसिद्ध पाश्चात्य साहित्यिक फॉकनर, आंद्रे जीद, मॉरियॅक व हेमिंग्वे त्यांच्या वाङ्मयांत ज्याला अश्लिल म्हणून मानतां येईल असे परिच्छेद, वर्णनें व प्रकरणें आहेत पण असें असूनहि त्यांच्या साहित्यसेवेबद्दल त्यांना जगन्मान्य नोबेल वाङ्मय पारितोषिकें दिलीं गेलीं आहेत. वाङ्मयीन सेवेचें मूल्यमापन साकल्यानें केलें जातें ही गोष्ट सुबुद्ध व सुविद्य वाचकाला माहित आहेच. हाच निकष फडक्यांच्या साहित्याला लावला तर त्यांचें साहित्यसमीक्षण, साहित्यतत्त्वचिंतन व शैलीमाधुर्य हे साहित्याच्या विविध प्रकारच्या अंगाशीं निगडित असलेले गुण फडक्यांच्या ठिकाणीं संभवत नाहींत असें त्यांचा शत्रूदेखील म्हणणार नाहीं. प्रा. फडक्यांचा नुकताच मुंबईत झालेला भव्य सत्कार त्यांच्या लोकप्रियतेचें गमक दर्शवितो. प्रस्तुतप्रसंगीं खांडेकरासारख्या एका ज्येष्ठ व विचक्षण साहित्यिकानेंदेखील फडक्याबद्दल असे गौरवाचे उद्गार काढले आहेत. फडक्यांनीं आपल्या लेखनात एक प्रकारची जशी शिस्त आणली तशी आपल्या वक्तृत्वानेंहि त्यांनीं छाप पाडली. फडके हे नाविन्याचे भोक्ते आहेत तसेच ते प्रयोगक्षम विचारसरणीचे पुरस्कर्ते आहेत. प्राध्यापकीय पेशात जीवनाचा अधिकाश समय व्यतीत केल्यामुळें तरुणांचे प्रश्न व आवडी त्यांना परिचित आहेत. त्यांची रसिकबुद्धि अजूनहि कुशाग्र असल्यामुळें त्यांची लोकप्रियता साहजिकच वाढते आहे. तिकीटे घेऊन व्याख्यानांचे कार्यक्रम करण्याचा त्यांनी पाडलेला पायंडा आज इतरांनाहि उपकारक ठरून व्याख्यात्याला मानधन व प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. प्रा. फडक्यांचे अष्टपैलु साहित्यिकत्व ह्या पद्मभूषण पदवीमुळें लोकमान्य झालें आहे ह्यात संदेह नाहीं. प्रा. फडके ह्यांना दीर्घायुरारोग्य प्राप्त व्हावो व त्यांची उत्तरोत्तर अशीच प्रतिष्ठा वृद्धिंगत व्हावो असें कुणाहि रसिकाला वाटेल. आम्हींहि ह्या इच्छेशी सहमत आहोंच.

—सारस्वत






**सत्यं. शिवं. सुंदरम्**

# ७ वें महाराष्ट्र राज्य कला प्रदर्शन

**—माधव सातवळेकर**

दरवर्षीप्रमाणें महाराष्ट्र राज्य कलाप्रदर्शनाचें यावर्षीहि मोठ्या समारंभानें उद्घाटन झालें. प्रदर्शनाच्या भव्य प्रमाणावर स्तुति-सुमनें उधळली गेलीं. मोठमोठीं बक्षिसें वाटलीं गेलीं. आता पहिला उत्साहाचा भर ओसरल्यावर प्रदर्शनाच्या कलामूल्याचा विचार करण्याची वेळ आली आहे.

प्रदर्शनातील मुख्य भर चित्रकलेवर दिसतो. आणि त्या दृष्टीनें विचार केला तर सर्वांत कमी दर्जाचा विभाग हा वाटतो. चित्रकलेच्या या दालनामध्यें एकूण ९७ चित्रें लावलेली आहेत. प्रदर्शनाच्या अधिकृत अहवालावरून असंख्य चित्रें आलेलीं होतीं. त्यांतून ही निवडक चित्रें लाविलेलीं आहेत! या चित्रांमध्यें १५, २० चित्रेंच अशीं आहेत कीं जीं चांगलीं म्हणतां येतील. बाकीच्या ७० चित्रांतील अर्धीं चित्रें सहज गाळतां आलीं असतीं.

प्रदर्शनातील सर्वांत उत्तम चित्र म्हणून श्री. पावळे यांच्या 'तिच्या जीवनाचें चित्र' या कृतीला बक्षिस मिळालें आहे. आणि तें सर्वस्वी योग्य आहे. त्या चित्रांतील सूत्रबद्ध मांडणी साधी पण परिणामकारक रंग पद्धति आणि रेखाकृतीवरील (line) आकर्षक प्रभुत्व या सर्व गोष्टींमुळें हें चित्र फार सुंदर झालें आहे यांत शंका नाहीं. श्री. पावळे यांच्या बॉम्बे आर्ट सोसायटीच्या चालू असलेल्या प्रदर्शनांतील आणि येथील चित्रांमध्यें तीव्र फरक जाणवतो।

दुसरें बक्षिस ज्या चित्राला दिलें आहे तें चित्र मात्र फारच खटकलें. कांहीं घरांच्या नकाशावजा ग्राफ कागदावर काढलेलें हें दृश्यावलोकन दृष्ट्या फार कमी प्रतीचें वाटलें. त्यापेक्षां दुसरीं अनेक सरस चित्रें प्रदर्शनांत आहेत. उदाहरणार्थ श्री. हरकृष्ण लाल यांचें ८ नंबरचें 'धुंदीतील रस्ता' हें चित्र किंवा श्री. एम. एस. जोशी यांचे 'खेडे-गांव' हें चित्र–तैलरंग व जलरंग यांत अनुक्रमें उत्कृष्ट म्हणून ठरण्यासारखीं आहेत. त्यांच्याकडे निरीक्षकाचे लक्ष गेलेलें दिसत नाहीं. श्री. चितळे यांचे 'बुक स्टॉल' हें चित्र अगदीं साधें पण मोठें आकर्षक झालें आहे. त्याची मांडणी व चित्र पद्धति अगदीं नाविन्यपूर्ण वाटते. श्री. सडवेलकर यांचे लहान चित्र Abstract कृतीमध्यें अगदीं उठून दिसतें.

बाकीच्या चित्रांबद्दल जास्त न लिहिलेले बरें. गुरुदेव टागोरांचे चित्र कोणत्या कला गुणासाठीं लावलें आहे हें समजत नाहीं!!

शिल्पकलेचा विभाग फार लहान आहे; पण त्याची मांडणी (Display) चांगली केली आहे. कलाकृतींचा दर्जा साधारणच आहे. दुसरें बक्षिस मिळालेले श्री. दविएर-वाला याचे शिल्प सर्वोत्कृष्ट आहे. दगडाच्या नैसर्गिक गुणाचा [कठीणपणाचा] फायदा घेऊन शिल्पाच्या आकाराचा (Form) साधे-पणा फार कौशल्यानें कोरला आहे. पण प्रथम श्रेणीचे ठरलेलें श्री. मानगुडकर याचे 'स्त्री' चें शिल्प परिणामकारक वाटत नाहीं. Texture ला अवास्तव महत्व देणें हें कलेचें प्रतिक ठरत नाहीं–तें कौशल्याचें (Craft) प्रतिक वाटतें. रमण पटेल यांचें 'ताशेवाले' व श्री. जोग याचे 'अंजू' हे व्यक्तिशिल्प वाखाणण्यासारखें आहे.

कमर्शियल कला विभागातील कांहीं पोस्टर्स आकर्षक आहेत–प्रथम बक्षिसाचें पोस्टर तर फारच सुंदर वाटतें. परंतु या क्षेत्रांतील इतर गोष्टींच्या कृति कोठें दिसत नाहीत, असें कां? फक्त पोस्टर्स हा एकच कमर्शियल आर्टचा विभाग होऊं शकत नाहीं. इतर माध्यमांनाहि वाव मिळावा असें सुचवावेसें वाटतें.

फोटोग्राफीच्या विभागांत एकहि असामान्य कृति आढळत नाहीं. तेच ते विषय त्याचत्या फोटोग्राफर्सनीं घेऊन फार शिळे झाले आहेत. हस्तकौशल्याचे लाकडी व धातूंचे नमुने अगदीं टाकाऊ वाटतात. त्यांत नवीनता व निर्माण शक्ति (Creative Ability) याचा पूर्ण अभाव वाटतो. शतकानुशतकें चालत असलेल्या गोष्टी पुनः पुनः करण्याला उत्तेजन देण्यापेक्षां तीं बक्षिसें न दिलेलीं बरीं,

शेवटीं विद्यार्थी विभाग आहे. त्यांतहि विशेष नाविन्य आढळत नाहीं.

सर्व प्रदर्शन पाहिल्यावर मनांत विचार येतो की सरकार एवढी मोठीं बक्षिसें (या-वर्षी रक्कम लहान आहे.) देत असतानांहि प्रदर्शनाचा दर्जा कां सुधारत नाही? राज्यांतील प्रथितयश कलाकारांच्या कृति तर कोठेंच दिसत नाहीत. त्याचा अर्थ मोठ्या रकमेचें अमिष कलावंतांना वाटत नाहीं; किंवा त्यांचा परिक्षकाच्या दृष्टीबद्दल मतभेद तरी असावा. या बाबतींत कांहीं सूचना करावयाशा वाटतात.

(१) प्रदर्शनांत इतके विभाग ठेवून ते अवाढव्य करण्यापेक्षां त्याचे दोन भाग करून ते निरनिराळ्या वेळीं भरवावेत. चित्रकला व शिल्पकला हा एक भाग व बाकीचे भाग Applied art च्या नांवाखालीं निराळे ठेवावेत व दोन प्रदर्शनें करावींत. यामुळें सर्वांची एकच खिचडी होण्यापेक्षां प्रत्येक क्षेत्राला थोडा जास्त वाव मिळेल.

(२) विद्यार्थी विभाग काढून टाकावा, किंवा त्याचें निराळें प्रदर्शन करावे. निर-निराळ्या संस्था, शाळा हीं प्रदर्शनें भरवींत असताना सरकारनें त्यानाच मदत देऊन हे कार्य सोपें का करूं नये.

(३) चित्राना मोठमोठीं बक्षिसें देण्यापेक्षां दरवर्षी कांहीं चित्रें विकत घेण्याचें कार्य केल्यास चांगल्या चित्रकाराकडून चित्रें पण येतील व सरकारकडे थोडीथोडी चांगलीं चित्रें व शिल्पें जमून पुढें ठिकठिकाणी म्युझि-यम्स् काढण्यासाठीं त्याचा उपयोग होईल. दुर्दैवानें आपल्या देशात अद्याप या गोष्टींकडे फारसें लक्ष दिलें गेलेलें नाहीं. मुंबईसारख्या शहरातसुद्धा आधुनिक चित्रकलेची काय-मची गॅलरी नाहीं तर इतर शहरांची काय वाट? दिल्लीला या दृष्टीनें प्रयत्न चालू आहेत, तसेंच आपणाहि हळूहळू केल्यास उत्कृष्ट कलाकृतींचें एक संग्रहालय सहज






होऊं शकेल. गेल्या ७ वर्षांत सरकारनें कला-प्रदर्शनावरच ४–४॥ लाख रुपये तरी खर्च केले आहेत. तेवढ्या पैशांत ४००–५०० कलाकृति तरी सहज संग्रहित करतां आल्या असत्या ! पुढच्या पिढीला हा वारसा मिळून त्याचा फायदा निःसंशय दिसून येईल यात शंका नाही.

(४) प्रदर्शनाचा खरा उद्देश सर्वसाधारण जनाची कला रसिकता वाढावी हा आहे. संगीतमहोत्सव वा नाट्यमहोत्सव भरवण्याच्या मागेहि तोच हेतू असतो. परंतु हे इतर महोत्सव जसे गाजतात तसे हें कला-प्रदर्शन गाजत नाही. त्याला अनेक कारणें आहेत. एक म्हणजे अपुरी प्रसिद्धी, दुसरें प्रदर्शनाचा साधारण दर्जा (पहिल्या प्रतीचे चित्रकार यांत भाग घेताना कधींच दिसत नाहींत.) आणि तिसरें म्हणजे लोकांमध्यें रसिकता किंवा लोकप्रियता वाढावी या दृष्टीनें प्रदर्शन कमिटीकडून पूर्णतः प्रयत्नच होत नाहीं. चांगल्या चांगल्या चित्रांतील कलागुण समजावून सांगण्यासाठीं समंजस व तज्ञ मार्गदर्शक ठेवल्यास व त्याची दिवसांतून ठराविक वेळीं भाषणें ठेवल्यास (पाश्चात्य देशातील म्युझियम्स मध्यें ही पद्धत आहे) सर्वसामान्य लोकात भिन्नभिन्न कलाकृतीं मधील चांगलेंवाईटपणा समजणें सोपें होईल. त्यामुळें कलेबद्दल वाटणारें अज्ञान व परकेपणा नाहीसा होऊन रसिकता निर्माण होण्यास बरीच मदत होईल.

(५) प्रदर्शन कमिटीमध्यें अशा लोकांना स्थान आहे कीं ज्याना केलेची आवड आहे आणि त्याबद्दल कार्य करण्याची कळकळ आहे. कमिटीचा सदस्य नुसता कलावान असून भागणार नाहीं कीं फक्त नामंवत असून चालणार नाही. कारण अशा लोकाना काम करण्याची आवडहि नसते व वेळहि नसतो, याला खरे तळमळीचे व होसी कार्यकर्ते पाहिजेत, त्यांच्या मदतीला सरकारी अधिकारी असावेत एवढेच.

(६) शेवटीं मुख्य म्हणजे चांगल्या चांगल्या चित्रकाराना चित्रें पाठविण्याबद्दल कमिटीनें आमंत्रण द्यावें. अमूक एका काला-नंतर स्पर्धात्मक प्रदर्शनात भाग घेण्याची इच्छा कलाकाराला नसते. म्हणून त्याच्या उत्तम कलाकृति मिळविण्याचा प्रयत्न व्हावयास पाहिजे; त्याला एक उपाय वर सुचवला आहे–तो चित्रें विकत घेण्याचा. तें एक थोडेफार तरी आकर्षण राहील. असो !

सरकार करीत असलेल्या वाढीसाठीं व उत्तेजनासाठीं करीत असलेल्या या उपक्रमात योग्य त्या सुधारणा केल्यास सर्व कलाकार तर ऋणी होतीलच, बहुजन समाजाला पण त्याचा फायदा जास्त मिळेल !

---

**क्रीडा**

# आजचा ‘ पद्मश्री ’ क्रिकेट

—वाळ ज. पंडीत

खेळाला उत्तेजन देण्यासाठीं सरकारनें खेळाडूंना किताबत देण्याचें धोरण आजकाल आखलेलें आहे तें अगदीं योग्यच आहे. इंग्लंडमध्यें आपण पहातो कीं हटन, पेलहॅम-वॉर्नर, लेस्ली जॅक्सन, जॅक हॉब्स इत्यादि खेळाडूंना त्याच्या सरकारनें ‘ सर ’ ही पदवी बहाल केलेली आहे. ऑस्ट्रेलियासारख्या दूरच्या देशात राहणाऱ्या पण क्रिकेटमध्यें अजरामर कीर्ति मिळवणाऱ्या डॉन ब्रॅडमनलाहि ब्रिटिश सरकारनें ‘ सर ’ ही पदवी देऊन त्याच्या सेवेचें चिज केलेले आहे आणि त्याच बरोबर आपली गुणग्राहकताहि प्रगट केलेली आहे. याशिवाय विविध देशातील खेळाडूंना इतर लहान सहान किताबती देण्याचा इंग्लंडमध्यें प्रघात आहे तो वेगळाच ! एकंदरीत इंग्लंडमधील प्रथा खेळाला अतिशय उपकारक आहे आणि त्यामुळें वैयक्तिक

मिळते. यांतूनच खेळाडूंच्या नव्या पिढीपुढें एक चागला आदर्श निर्माण करण्यात येतो !

भारतातहि अशाच तऱ्हेची प्रथा सरकार आता सुरू करीत आहे ही आनंदाची गोष्ट म्हटली पाहिजे. सी. के. पटेल, हजारे याना आतापर्यंत पदव्या देण्यात आलेल्या आहेतच. केवळ क्रिकेटमध्येंच मात्र अशीं मानपदकें न देता तीं इतर सर्व खेळातील सर्वोत्कृष्ठ व आदर्श खेळाडूला दिलीं जावीत या बाबतीत केवळ एकट्या क्रिकेटचीच मिजास चालूं देणें कदापिहि योग्य नाहीं. आणि शिवाय क्रिकेटमध्यें देखील अशा किताबती देताना सरकारनें तारतम्य वापरणें इष्ट आहे. हे पारितोषिक जें दिलें जाते तें "आऊटस्टॅन्डिंग सर्व्हिस टू स्पोर्टस" या कसोटीस जो उतरेल अशालाच. अशी आऊट स्टॅन्डिंग सर्व्हिस ही केवळ त्या वर्षांपुरतीच मर्यादीत ठेवणें.हे सदैव इष्टच असतें असे नाहीं. त्यावेळच्या परिस्थितीचा साधासार विचार करूनच हें ठरवलें गेलें

आपले तन, मन आणि धन खेळासाठीं सदैव वाहिले आहे जीवनभर त्या खेळाची उपासना चालू ठेवली आहे आणि पराकोटीचें अनुकरणीय यश त्यात मिळवलें आहे अशालाच सरकारी किताबतीचा मानकरी होण्याची संधी वास्तविक मिळाली पाहिजे. परंतु प्रत्यक्षात मान केवळ आदल्या वर्षाचीच कामगिरी लक्षात घेऊन किताबतांची खिरापत वाटण्यात येते. मात्र एखादी अभूतपूर्व घटना घडली आणि तिच्यामुळें त्या खेळाला भावी काळात नवी अनुकूल कलाटणी मिळणार असली तरच त्या घटनेच्या शिल्पकाराला किताबत देण्यास हरकत नसावी. एरवीं मात्र खेळाडूची खेळाची सबंध कारकीर्दच साकल्यानें विचारात घेतली जावी.

या दृष्टीनें पाहता कॉन्ट्रॅक्टरला जी पदवी देण्यात आली आहे ती अस्थानी वाटते. एम्. सी. सी. दौऱ्यातील त्याचें यश लक्षात घेऊनहि मी हें लिहित आहे. तसेंच उम्रीगरला देखील अकाली पदवी मिळाल्यासारखी वाटते. तो निवृत्त झाल्यानंतरच त्याच्या सेवेचा पदवी देऊन गौरव करणें अधिक शोभलें असतें. अशा या खेळाडूंना आज पदवी मिळाल्यानंतर ते जर खेळत राहिले तर उद्या त्यांच्याकडून होणारा खेळहि पदवीच्याच दर्जाचा उच्च व्हावा अशी कुणीहि रास्त अपेक्षा धरतोहि






होऊं शकली नाहीं तर सरकार बरोबरच त्या खेळाडूलाहि नांवें ठेवली जातात. अशा खेळाडूना म्हणजे ज्यांचा पराक्रम कॉट्रॅक्टर प्रमाणें विशिष्ट सालापुरताच मर्यादित स्वरूपाचा असतो; त्याना त्या सालाचे "श्री भारतीय कप्तान" अथवा "श्री फलंदाज फलंदाज" म्हणून जाहीर करण्यांत यावेत. किंवा बर्मा वगैरे इतर देशांप्रमाणें त्यांच्या चित्राचे 'पोस्टल स्टॅम्प्स' काढावेत. परंतु अशाना [ एकाच सालात चमकूनहि ] जन्मभर टिकणारी 'पद्मश्री' वगैरे पदवींचा उपाधि चिकटेविणें गैर वाटतें.

विशेषतः आज देशात, वयाची नुकतीच सत्तरी ओलांडलेले व महाराष्ट्र क्रिकेटचे प्रणेते असलेलें प्रा. देवधर, अस्पृश्य असुनहि अंगात गुण असल्यास खेळाडू किती वरच्या दर्जापर्यंत पोहोचूं शकतो आणि इतराना स्फूर्तिदायक उदाहरण घालून देऊं शकतो हे सिद्ध करणारे पां. विठ्ठल, वयाची नुकतीच पन्नाशी उलटलेले व भारतीय फलंदाजांतील अभिमान बिंदू असलेले विजयभाई मर्चंट आणि भारतीय क्रिकेटमध्यें अपूर्व सर्वांगीण कामगिरी करणारे विनू मन्कड हे असताना कॉन्ट्रॅक्टर व उम्रीगर याची अगोदर वर्णी लागावी याबद्दल सखेद आश्चर्य वाटतें. कदाचित् सरकार पुढील वर्षी वरील खेळाडूंची दखल घेईल अशी आशा करूंया. आणि तसें झालें तर सरकारी धोरणाचें सर्वत्र स्वागत झाल्याशिवाय राहणार नाहीं.

यंदा टेनिसच्याच धर्तीवर जॅक क्रॅमरप्रमाणें कॉमनवेल्थ क्रिकेट खेळाडूंचा एक 'सर्कस' आफ्रिका व आशिया या खंडातील विविध देशांतून मुशाफिरी करणार आहे. आणि ठिकाठिकाणी 'मुक्काम' ठोकून क्रिकेटचे सामने घडवून आणणार आहे. ही आवव्याची मोट बांधण्याचे खडतर कार्य रॉन रॉबर्टस् या एम्. सी. सी. बरोबर भारतात येऊन गेलेल्या इंग्लिश टीकाकारानें पत्करलेले आहे.

जगांतील उत्कृष्ट खेळाडूंच्या बॅटमधून स्रवणारी क्रिकेटची गंगा भगीरथ प्रयत्न करून प्रत्येक देशाच्या दारासमोर आणण्याचें हें काम जरी लोकप्रिय होण्यासारखें असलें तरी यात केवळ द्रव्यार्जनाचाच हेतू असूं नये, या योजनेतून कधीं न पाहिलेले व गाजलेले खेळाडू एकाच वेळीं एकत्र पहायला सापडतील हे खरें असले तरी त्या सर्वांचा हा 'संयुक्त नाटकी प्रयोग' प्रत्येक खेळाडूचे नैसर्गिक गुण कितपत बाहेर आणील आणि प्रत्येक देशांत मिळणाऱ्या एकाच संधीत त्या गुणाचा आविष्कार तरी कितपत समर्थपणें होईल याबद्दल शंका वाटते. शिवाय यातून त्या त्या देशांतील क्रिकेटला चालना तरी कितीशी मिळणार आणि होतकरू खेळाडूंना अनुकरणीय असे त्यात कितीसे व काय सापडणार? कारण सामने महोत्सवी स्वरूपाचे असल्यानें खेळाडू त्यात मन लावून खेळणें अशक्य आणि स्वतःच्या अंगाला तोशीस लावून घेणेंहि अशक्य.

तथापि ही प्रथा आफ्रिकेंतील नवजात क्रिकेट प्रेमी राष्ट्रांच्या दृष्टिनें थोडीफार फायद्याची ठरेल असें म्हणतां येईल. परंतु भारताला कौड्री, लार्टर वगैरे एखाद दुसरच चांगले खेळाडू यातून 'पाहायला' सापडणार असल्यानं आपल्या दृष्टीनं या सामन्यांत विशेषसें नावीन्य नसणार हे उघड आहे.

शिवाय आपण म्हणे मॅक्लीन, ॲडकॉक या साऊथ आफ्रिकन् खेळाडूना आपल्या देशात खेळण्याची परवानगी नाकारली आहे. अशा 'सर्कस' मधून वरील प्रमाणें प्रश्न निघणे ही घटनासुद्धा गैरसमजाला व निष्कारण कटुतेला कारण होत असते. तेव्हा असे आंतरराष्ट्रीय जाती भेदाचे प्रश्न या दौऱ्यातून निघत असतील तर हा दौरा, क्रिकेट दौऱ्याचे जें एक उद्दिष्ट–देशादेशात सद्भावना व सहकार्य प्रस्थापित करायचें–तें कितपत साधणार?

तथापि हा दौरा एक टीकाकार आखीत आहे व कार्यवाहीत उतरवीत आहे हे लक्षात घेतलें पाहिजे. इंग्लंडमध्यें टीकाकाराच्या शब्दालाहि केव्हढा मान आहे आणि कोणत्याहि टीकाकाराला त्याच्या सेवेचं चीज झालें तर खेळासाठी व खेळाडूसाठी कसें सक्रीय साह्य करता येतें हे रॉन रॉबर्टस्च्या उदाहरणावरून खचितच स्पष्ट होतें. पूर्वी इ. डब्ल्यू स्वॉटन या इंग्लिश टीकाकारानें असेच दोन इंग्लिश खेळाडूंचे दौरे वेस्ट इंडिज देशांत स्वतःच्या देखरेखीखाली घडवून आणले होते त्याची याप्रसंगीं आठवण होते. ● ● ●

( पान ५१ वरून )

करावा. म्हणजे स्पर्धक संस्थांना तो सहज उपलब्ध होईल. आपल्या नाट्यप्रयोगांतील गुणदोषांचे विवेचन वाचून आपल्या दर्जाबद्दल त्यांना चांगलीच कल्पना येईल व इतर संस्थांच्या मानानं आपण कुठं व किती कमी पडतो ह्याचा नीट व अचूक अंदाज प्रगतीच्या दृष्टीनें हि ते परिणाम घडून येतील! परीक्षकांनी आपल्या अहवालांत ज्या संस्थांना मुळींच दर्जा नाहीं किंवा ज्यांना किमान दर्जा सांभाळता आला नाहीं असे नमूद केलं असेल अशा संस्थाना सरकारनं ताकीद देऊन दर्जा सुधारण्याची संधी द्यावी. पुढील वर्षीहि कांही सुधारणा नसल्यास त्या संस्थेला एक वर्ष तरी स्पर्धेत भाग घेण्यास बंदी करावी (त्याचं अनुदान चालू ठेवण्यास हरकत नाहीं!) अशानं प्रत्येक संस्था आवश्यक तो दर्जा गाठण्यासाठी, टिकविण्यासाठी अत्यंत जागरूक राहील.

अंतिम स्पर्धेत पहिल्या दोन क्रमाकानें येणाऱ्या नाटकाचें प्रयोग प्राथमिक स्पर्धा होणाऱ्या केंद्राच्या ठिकाणी (निदान बाहरगावच्या) सरकारनं घडवून आणावेत. धंदेवाईकाचे 'सुविहित' किंवा 'विशेष आयोजित' प्रयोग केवळ पुरस्कृतच करण्यापेक्षा हा उपक्रम हौशी नाट्य संस्थांच्या दृष्टीनं अधिक उपयुक्त।

सगळीकडच्याच संस्था एकंदरीनं प्रगती करत आहेत. जास्त संस्था व जास्त मंडळी स्पर्धेत भाग घेत आहेत इत्यादि गुळगुळीत विधान करून स्वतःची फसवणूक करून घेण्यात काय अर्थ आहे? जेव्हा संस्था व अधिक कलावंत स्पर्धेत भाग घेत आहेत तेव्हा फारतर स्पर्धा अधिकाधिक लोकप्रिय होत आहेत असेच म्हणता येईल. स्पर्धेचा हेतू सफल होतो आहे असं मानण्याचं कारण नाही. ● ● ●

( पान ५७ वरून )

त्याच्या वाटेस जाणें म्हणजे घोर पावित्र्यविटंबन ठरेल.

ज्ञानेश्वर नाडकर्ण्यांची कथा 'फालेती-मध्यें' काकासाहेब गाडगीळांच्या 'भावनात्मक ऐक्या'च्या पार्श्वभूमीवर खुलून दिसते. मोहन वाघाच्या चित्रकथेत उमटलेला जयश्री गडकरचा 'तोच तोच' चेहरा श्री. प्रभाकर गोऱ्यांच्या गुढगुंजनामुळें कूटप्रश्नासारखा वाटतो.

एकंदरित ह्या बहुविध साहित्य गाथेंत संग्रहित केलेलें साहित्य सखोल अगर वरवर चाळल्यास ह्यापैकीं कांहीचें साहित्य ह्यात कां यावे व कांहीचे कां आलें हा प्रश्न चाचपडणाऱ्या वाचकास पडतो. एकाच वाक्यात मत द्यायचें म्हटलें तर हा 'नवदिशे'चा एक अंक एकांतात (गुप्तपणें) पाहाणाऱ्या वाचकाची देखील पूर्णपणें दिशाभूल करेल. —अनिकेत

संपा॰: सदानंद भटकळ, प्रभाकर गोरे व कृष्णा करवार, पॉप्युलर बुक डेपो, पृ. २३६ कि. रु. ३–०–०







अनुक्रमणिका



# • दिशा भूल : जत्रा

—अनिकेत

नवदिशा, जत्रा, व बहुविध साहित्य गाथा ह्या परस्पर पूरक नामत्रयींनीं एका संपादकत्रयींनीं निर्माण केलेला हा ग्रंथ कीं नैमित्तिक अंक उपर्युक्त तीनहि नामाभिधानांस अनुरूप ठरण्याइतका वैचित्र्य पूर्ण वाटतो. जणुं काय मराठी साहित्याला दशदिशा दाखविण्यासाठीं सज्ज झालेले एक सुविद्य प्रकाशक, एक ख्यातनाम चित्रकार व एक कसबी मुद्रक ह्यांनीं आपापलें कौशल्य एका मुशींत ओतून तयार केलेला हा नमुना कल्पनेबरहुकुम एकजीव न झाल्यामुळें त्यांतले सप्तरंग सप्तप्रकरणात्मक अवगुंठनांत गुंडाळून उधळलेले आहेत, कुणा पाश्चात्य तत्ववेत्त्यानें सांगितलेला 'ग्रंथ हा आपुला मित्र आहे' हा विचार जुनाट व बुरसटलेला अतएव आधुनिक युगास विसंगत आहे असें वाटून कीं काय नवदिशेच्या प्रश्न चिन्हांकित प्रस्तावनेंत प्रस्तुत जत्रेची मैत्रीण म्हणून शिफारस केलेली आहे. आणि म्हणूनच नवदिशा दाखविण्यासाठीं प्रभाकर पाध्यांच्या 'मैत्रिणी' ची प्रथम योजना केलेली आहे. त्यानंतर विजय तेंडुलकरांची एकांकिका 'अजगर आणि गंधर्व;' सहा कवींची संकलित 'कुहुकहु कावकाव,' जयश्री गडकरचें मोहन वाघ व प्रभाकर गोरे ह्यांनीं केलेलें 'कौतुक'; डॉ. का. न. डोळयांचा नवा दृष्टीक्षेप-सुखाच्या शोधांत; पांच नवकथाकारांच्या पांच कथा व शेवटीं उतारा म्हणून काकासाहेब गाडगीळांचा 'भावनात्मक ऐक्य' हा स्फुट लेख अशा बहुविध साहित्याची मिसळ कां केली आहे ह्याचें उत्तर शोधण्यासाठीं जत्रेंत जाण्याचे आवाहन प्रकाशकांनीं केलें आहे.

प्रभाकर पाध्यांच्या 'मैत्रीण' ह्या कादंबरिकेचा नायक राजनारायण ह्याच्या संसाराचें रसायन बिघडलेलें असतें. राजनारायण हा कुठल्याशा कॉलेजांत इंग्रजीचा प्राध्यापक असतो हा प्राध्यापक आंतरराष्ट्रीय वर्तुळांत असामान्यसाधारण असावा म्हणून त्याला कादंबरिकेच्या सातव्या पृष्ठांपासून तो तहत एकशें दोनाव्या पृष्ठापर्यंत लेखकानें निरनिराळ्या परिषदांना धाडलें आहे. अर्थात त्याचे हें परिषदगमनागमन हेत्वर्थमूलक आहे आणि तें म्हणजे आपल्या विषयाचे ज्ञानसंपादन नसून 'सचिवासखिमिथः' टाईपची मैत्रीण संपादन करून जीवनांत महानुभूतीचा ओलावा निर्माण करणें हा असतो. सामान्य लेखकानें हे सखिसंशोधन करण्यासाठी नायकाला स्थानिक परिसरांत, कदाचित् आपल्या विस्तीर्ण भारतांतच - पिटाळून त्याचा व्यवसाय, पैसा व राष्ट्रीयत्व अबाधित् राखलें असतें. पण 'पण देशाटन–पंडीत मैत्री सभेंत संचार' केलेले पाध्ये असल्या क्षुद्र पातळीवर न राहतां आपल्याचप्रमाणें आपल्या नायकाला एकदम 'इन्टरनॅशनल इन्टलेक्चूअल' बनवून परिषदेच्या निमित्तमात्रें स्वैरसंचार करण्यास प्रवृत्त करतात. म्युनिखच्या इंग्लीस टीचर्स कॉन्फरन्सला राजनारायणला के हॉवर्ड नांवाची अमेरिकन मास्तरीण भेटते आणि अधिर प्रियाराधनानें बिघडलेल्या रंगतींत परिषद संपते आणि परदेशगमन अकृतार्थ ठरतें. प्रस्तुत परिषदेपूर्वी शुद्ध सात्विक मैत्रीणीशी निर्मळ स्नेह जोडूं इच्छिणारा राजनारायण ह्या के हॉवर्डला 'निसर्गानेंच मुळीं दोन जाति निर्माण केल्या आहेत. त्यांची युति झाल्याखेरीज जीवनाला पूर्णता कशी येणार ?' हा मूलप्रश्न विचारून 'भावनांच्या रसायनाशिवाय या युतीला स्फुरण चढत नाहीं—' हा प्रेमशास्त्राचा सिद्धांत सप्रात्यक्षिक पटवून देण्याच्या प्रयत्नांत ही शुद्ध सात्विक मैत्री (ण) बारगळते. मुंबईला परत आल्यावर कॉलेजमधल्या मीनाक्षी त्यागराजन् ह्या सहकारीणीवर एक-दोन खडे टाकून रंगूनला परिषदेसाठीं जातो. तिथें ज्युली सिमन्स ही गुलाबी आरक्त (?) डोळे, लाल लाल अंगकांति, व लाल लाल सोनेरी (?) केंस असलेली चित्रकार तरुणी भेटते. तिला 'इमोशनल क्रायसिस' समजावून देण्याच्या प्रयत्नांत प्रकरण फसतें व नायक पुन्हां मुंबईला परततो. तोच त्याला मद्रासच्या परिषदेचे आमंत्रण येते. मद्रासला त्याला 'लिटल लेडी' राजलक्ष्मी भेटते व तिच्या लाडीक बोलण्यानें राजनारायणचा 'संयम सैल होतो.' मॉम, मोराविया नेव्हिल शूट, व रिचर्ड मेसन वाचणाऱ्या राजलक्ष्मीचें शिक्षण पूर्ण करण्यासाठीं राजनारायण स्वखर्चानें तिला फ्रान्स सगांची कादंबरी विकत घेऊन देतो. राजलक्ष्मीच्या मतें 'मोठे विद्वान, इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून परदेशांत देखील प्रसिद्ध असणारे– फॅशनचं बोलावणं वारंवार येणारे' असे आमचे नायक ह्या प्रकरणांत देखील गोता खातात आणि त्यांना (किंचित्काल विश्रांति मिळावी म्हणून) त्यांच्या बायकोला अपघात होऊन तिच्या उशाशीं चिंतन निरीक्षण करीत काळ कंठावा लागतो. एवढ्यांत फिलिपीन्मच्या कॉन्फरन्सचे आमंत्रण येतें तेथें जिला 'चंट' म्हणतां येईल अशी लीना कॉन्झालिस नायकाला भेटते वगैरे वगैरे. (पुढील कथानक वाचकांनी प्रत्यक्षच वाचलेलें बरें)

ह्या एकशें दोन पानांच्या अल्पव्याप्तीच्या कादंबरीत पाध्यांनीं आपल्या आंतरराष्ट्रिय वजनाचें बरेच चमत्कार घडवून आणलेले आहेत हे कुणाहि वाचकाला आढळू शकेल. कांहीं मैत्रिणी आणि एक मित्राचा ही रम्य कथा इतक्या विविध वातावरणांत रंगवतांना स्थलकाल कर्तृत्वाची युति प्रयासानें साधणाऱ्या लेखकाचें कौशल्य फक्त कळसूत्री कलाकाराच्या तोडीचेंच ठरूं शकेल. केवळ आपल्या क्षुल्लक पात्राच्या सोयीसाठीं आणि सयीसाठीं युनेस्कोसारख्या आंतरराष्ट्रिय संस्थेंत आपलें वजन खर्च करून तिला अल्पकाळांत देशोदेशीं परिषदा भरविण्यास भाग पाडण्याचा विक्रम केवळ मराठी साहित्यांतच नव्हे तर आंतरराष्ट्रिय साहित्यांतहि 'न भूतो न भविष्यति' ठरावा 'या कृतीच्या निर्मितीस कारण असलेल्या व्यक्तीस' कर्त्याबरोबरच वाचक अभिवादन करतील ह्यांत संदेह नाहीं

ह्या जिवनेगी मैत्रिणींच्या कचाट्यांतून सुटलेला वाचक पळून न जातां पुढें 'जत्रें'त शिरला; तर तेंडुलकरांचा अजगर आणि गंधर्व 'जयवन्त दळवींची 'उत्तरवाट' वसन्त मानेंचा 'लोलक' पाडगांवकराच्या वात्रटिका, करंदीकर, रेगे, बोरकर, बापट इत्यादिकांच्या सुरम्य कविता ह्या नऊदिशांत रमून जाईल. प्रभाकर पाध्यांच्या 'मैत्रिणी'चा सांस्कृतिक उन्माद ओसरून जरा पुढें जावें तो भाऊ पाध्ये आपल्या फाल्गुनी भाषेंत 'धमाल' उडवून पुन्हां नवदिशा दाखवण्यास सज्ज. ह्या 'धमाली' चें रसग्रहण ती स्वीकारणारे सुबुद्ध सुसंस्कृत संपादकच करण्यास समर्थ ठरतील. इतरांनीं

[ पान २६ वर ]











अनुक्रमणिका

( पान ९ वरून )

केली होती पण मालकम मगरिज या तेव्हांच्या एका मंत्र्यानें ( व नंतर 'पंच'च्या संपादकानें ) तांतडीनें येऊन वुडहौसला सोडवून इंग्लंडला नेलें. तेथें सर्व खुलासा झाला व व्हर्जीनिया वुल्फ आदिकरून वीस लेखक-लेखिकांच्या सह्यांनीं एक पत्र प्रसिद्ध करून त्यांत वुडहौसनें शत्रूसाठीं प्रचार केला नाहीं अशी आपली खात्री झाल्याचें सर्वांनी जाहीर केलें. परिणामीं शिवी म्हणून दिलेलें 'कसरत करणारी ऊ' हेंच नांव धन्यवादपूर्वक स्वीकारून वुडहौसनें तें आपल्या पत्रचरित्र ग्रंथाला दिलें!

दुसऱ्या महायुद्धानंतर कांहीं वर्षें इंग्लंडमध्यें काढल्यावर वुडहौस सहकुटुंब अमेरिकेंत जाऊन स्थाईक झाला व अमेरिकन नागरिक बनला. पन्नास वर्षें त्याचा अमेरिकन वाचकवर्गाशीं व रंगभूमीशीं निकट परिचय होताच. त्याच्या कादंबऱ्यांची पार्श्वभूमि इंग्लंड असली तरी त्याचा वाचकवर्ग अमेरिकन त्याचप्रमाणें सर्व इंग्रजीभाषी देशांतून आहे. ऐंशी वर्षें उमरीला रोज सहा तास काम करणारा हा विनोदमहर्षि रोज नियमित व्यायाम घेतो. पत्नी व दोन मुलींच्या सुखी संसारांत रमतो, आपल्या कुत्र्यांचे लाड करतो व भोंवतालच्या घडामोडींवर बारीक लक्ष ठेवतो. न्यूयॉर्क राज्यातल्या एका खेड्यांत तो राहतो व रोज मैलभर चालत जाऊन पोस्टातून आपलें टपाल घेऊन येतो. त्याचे चरित्रविषयक दुसरें पुस्तक 'ब्रिंग ऑन द गर्ल्स' (येऊं द्या आतां पोरी) त्याचा नाट्यसहकारी गाय बोल्टन याच्याबरोबर लिहिलेलें इतिहासवजा आहे, पण त्यांत एकाद्या किंवा दोनतीन कादंबऱ्यांइतकी भरपूर करमणूक आहे. 'ओव्हर सेव्हण्टी' (सत्तरी ओलांडली) हें तिसरें आत्मचरित्र म्हणजे गुदगुदल्या करणारी शुद्ध टिंगलबाजी आहे. एका काल्पनिक प्रश्नपत्रिकेला उत्तरें देण्याच्या निमित्तानें या वयाला काय होतें, काय वाटतें आणि काय संभाळावें लागतें याची चर्चा करतांना वुडहौसनें स्वतःचीही जी टर उडवली आहे ती मोठी प्रसन्न वाटते.

अस्वार्ननें आपल्या पुस्तकाच्या अखेरीस साररूपानें मांडलेला विचार वुडहौसच्या निष्ठावंत वाचकाला सहज पटेल. 'वुडहौसला त्याचे फॉर्म्युले सुमारें अर्ध्या शतकापूर्वी मिळाले. गंमतीदार माणसें, गंमतीचे प्रसंग, गंमतीची भाषा. हें काम सोपें वाटतें, वुडहौस्ला तें कधींच सोपें गेलें नाहीं, पण तें काम उत्तम रीतीनें करण्याखेरीज दुसरें कांहीं करावें असेंहि त्याला कधीं वाटलें नाहीं. त्यानें आपलें काम फारच उत्तम केलें आहे आणि अजूनही तो तें करीत आहे. छापील शब्दानें हांसविण्याच्या पेशांत तो सर्वश्रेष्ठ धंदेवाईक आहे आणि 'आतां थट्टामस्करी पुरे करण्याची वेळ आली' असें त्यानें कधींच ठरवूं नये अशी आशा आपण केली पाहिजे''

''गंमतीदार माणसें, गंमतीचे प्रसंग, गंमतीची भाषा' यांची गुंफण करून वाचकांना हसविणें ही जरा कमी प्रतीची साहित्यसेवा आहे असें आपल्याकडील प्रतिष्ठित विद्वान मानतात असें वाटतें. अशा पढत पंडितांनींच गंमत, गमत्या माणूस, गंमतीच्या गोष्टी अशा बहुजनसुलभ साध्या कल्पनांचा विनोद, विनोदी लेखक, विनोदी वाङ्मय असे भारदस्त पर्याय काढले. गंमतीला विनोद हा पगडबंद शब्द मिळाल्यापासूनच विनोदाची मीमांसा व पृथक्करण सुरू झालें. विनोदश्रीचें सोयरसुतकहि नसलेल्या विद्वानानें विनोदाचें मानसशास्त्र काढलें. त्यावर इकडच्या आड गिऱ्हाइकी एतद्देशीय भाष्यकारांनीं तर्कटें रचलीं, तरीहि अजून गमतीचा लाभ घेणारे व तिचा पुरवठा करणारे गमत्ये लेखक यांच्या आनंदाला विनोदशून्य विद्वानांचें विरजण लागूं शकत नाहीं हें सुदैव.

'पी. जी. वुडहौस ॲट वर्क' लेखक रिचर्ड अस्बॉर्न, प्रकाशक हर्बर्ट जेन्किन्स, लंडन, डिसेंबर १९६१, किंमत २९ शिलिंग.

● ● ●

( पान १० वरून )

ही ज्योतहि कांपत आहे. धीर घेण्यासाठीं ती ज्योत मालकिणीकडे वळली आहे. ज्योतीला धीर तिचा. तिला धीर ज्योतीचा. या ज्योतींतूनच ती सारें कांहीं बोलत आहे. तिनें पणती अत्यंत हलुवारपणें धरली आहे. उठवळ उन्मादाचा सारा अभाव आणि घरंदाज शालीनतेचा सारा प्रभाव तिच्या डाव्या हाताच्या तर्जनीच्या अग्रामध्यें उत्कर्ष पावला आहे. हा ताण सहन न झाल्यामुळेंच भारावून जणूं काय ती तर्जनी वांकली आहे. सुखाचें जें पर्व पुढें आहे त्याच्या चिंतनानें स्फुरूनच जणूं काय ती कनिष्ठिका वर उंचावली आहे. जशा हलुवारपणानें आपण हें ज्योतिरूपी हृदय हातांत धरलेलें आहे तशाच हलुवारपणानें कांतानें आपणास कुरवाळावें अशी या मुग्धेची प्रार्थना आहे.

ते सरसरलेले ओंठ, ते गोबरेगाल, बाळशाचें स्मरण करून देणारी ती हनुवटी, तो कोमल करतल, त्या लुसलुसित करांगुली, ते मृदुल कुंतल, साकल्यानें निरामय मुग्धतेचें आणि अनायास आरोग्याचें अर्घ्य अर्पून प्रार्थना करीत आहेत कीं हे स्वातंत्र्यसूर्या हे तेजोमय कांता, मी सरावलेली नाहीं. मला सांभाळून घे. मी तुझीच आहे. मला सांभाळून घे.

बहिरंगांतच अंतरंगाचें इतकें दर्शन झाल्यावर अंतरंगाबद्दल वेगळें काय लिहावें? मोगरीच्या कळ्यांचें जें सुगंधभांगर आंत भरलें आहे आणि धालो मधील रंभांच्या मळभापरीस 'देलीकाद' चाचीचें जें 'बेफत' रूपकार आंत आहे त्याचेहि नियाल करावें तेवढें थोडेच.

श्री. पुराणिक यांच्या मताशीं मी सहमत आहे. गेल्याच महिन्यांत कळविणार होतों. पण न ब्रूयात् सत्यमप्रियम् म्हणून स्वस्थ बसलों. खरें म्हणजे श्रेयनामावलीमध्यें पृष्ठांक दिला तरी वाचकांस अधीक सुकर होईल. 'तर्कतीर्थांचे खंडीत' यांतील खंडीत शब्द अर्थ विपर्यास करणारा आहे असे मला वाटतें. माझें वाटणें चूक असेल तर क्षमा असावी. कळावें,

आपला,
**आनंद साधले**
मुंबई-२९.

हें मासिक, संपादक व मुद्रक श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०।४२ कॅनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रकाशित केलें.

# केशभूषेचें सौंदर्य

**स्वस्तिकचे परफ्युम्ड कॅस्टर ऑइल** वापरल्याने उत्तम केशभूषेच्या सौंदर्याचा ठेवा तुमच्या मालकीचा होईल. कारण ह्या तेलाने तुमचे केस मोहक व मुलायम होतात






**केशरचनेकरितां सूचना :**

केसांना स्वस्तिक परफ्युम्ड कॅस्टर ऑइल लावून ते हलकेच विंचरा. सर्व केस एकत्र करून मागील बाजूस एका रिबिनीने बांधा. नंतर सर्व केसांचा एकत्र विळखा घालून ते वरच्या बाजूस आकड्यांनी टाचा आणि उरलेले केस डाव्या बाजूस तसेच ठेवा (आकृति पहिली) उरलेल्या केसांची वेणी घालून तिचे टोक आधीच्या विळख्यात अडकवा (आकृति दुसरी) नंतर ही केशरचना आकडे लावून पक्की करून त्यावर दागिने माळा.

स्वस्तिक केशरचना शैली "अलंकार"



**स्वस्तिक**
ऑइल
मिल्स लिमिटेड,
मुंबई

Shilpi S.O M. 11-A MAR









